

महाराष्ट्रातील ग्रंथालय-
चळवळीतील अग्रगण्य
कार्यकर्ते व महाराष्ट्रीय
वाचनालय संघाचे प्रणेते

**कै. श्री. द. वा. जोशी**

आणि

महाराष्ट्रीय मोफत
वाचनालय परिषदेचे
प्रथम अध्यक्ष व
'जयकर ग्रंथालया'चे
स्फूर्तिदाते

**कै. डॉ. बाबासाहेब
जयकर**



**यांना समर्पण**

# प्रकाशकाचे निवेदन

महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघाचे हे पाचवे प्रकाशन ग्रंथालयप्रेमी वाचकांच्या हाती देताना आम्हाला आनंद होत आहे.

ग्रंथाच्या निर्मितीसाठी लेखक श्री. शां. ग. महाजन यांनी घेतलेले परिश्रम अमोल असून यापुढेहि अशाच प्रकारे ते ग्रंथालय क्षेत्राची सेवा चालू ठेवतील असा विश्वास आहे.

ग्रंथाच्या आरंभी जोडलेल्या उपोद्घातात श्री. शां. ग. महाजन यांनी आपण गोळा केलेल्या माहितीवर आधारून काही निष्कर्ष काढले आहेत. अनुभवाच्या तारतम्यामुळे अशा प्रकारची मते व्यक्त करण्याकडे पुष्कळांचा कल होतो. श्री. शां. ग. महाजनांनीहि तसे केले असल्यास नवल नाही. तथापि कोणत्याहि तऱ्हेच्या मतप्रदर्शनाला पुरेसा वाव मिळाला पाहिजे असे संघाचे धोरण असल्यामुळे आमच्या या प्रकाशनात आपल्याला जे काही वाटते त्याची प्रामाणिक मांडणी करण्याचे स्वातंत्र्य संघातर्फे त्यांना देण्यात आले आहे. अनुभवी वाचक हा मजकूर वाचून हंसक्षीर न्यायाने त्यातला तरतमभाव ओळखण्यास समर्थ आहेतच.

—प्रकाशक

# प्रस्तावना

ग्रंथालयीन क्षेत्रात आज बरेच विचारवंत ग्रंथपाल आपआपल्या परीने काम करीत आहेत व ग्रंथालयीन व्यवसायाला त्याची योग्य प्रतिष्ठा व समाजजीवनातील वास्तव स्थान प्राप्त करण्याच्या खटपटीत आहेत. अशा कार्यकर्त्यांपैकी माझे मित्र, जयकर ग्रंथालयाचे प्रमुख तालिकाकार, श्री. शां. ग. महाजन हे आहेत. निरलस बुद्धीने, स्वतःच्या कार्याचा गाजावाजा न करता त्यांनी ग्रंथालयीन ज्ञानात भर घालण्याचा उपक्रम सातत्याने चालू ठेवला आहे. या व्यवसायनिष्ठेचा एक नवीन पुरावा म्हणजेच त्यांचा हा प्रस्तुतचा ग्रंथ "महाराष्ट्रातील ग्रंथपाल, ग्रंथालयसेवक व ग्रंथालयीन कार्यकर्ते यांची सूचि." संदर्भ ग्रंथ आहे हा आणि यापूर्वी १९६५ साली त्यांनी प्रसिद्ध केलेली "महाराष्ट्रातील ग्रंथालयांची सूचि" हाहिपण तसाच संदर्भ ग्रंथ. अशा संदर्भ साहाय्यांची उपयुक्तता निर्विवाद आहे. ग्रंथपालांना तर अशी संदर्भसाधने नेहमीच हाताशी लागतात. त्याचप्रमाणे जाणकार व ग्रंथविक्रीचा व्यवसाय याची कदर करणाऱ्या प्रकाशकांना पण. जिज्ञासू व चिकित्सक वाचकाने ही सूची डोळस रीतीने पाहिल्यास, म्हणजे ज्याला आपण इंग्रजीत reading between the lines म्हणतो अशा तऱ्हेने, तर ग्रंथालय क्षेत्रातील कार्यकर्त्यांविषयी शैक्षणिक, सामाजिक व आर्थिक माहिती मिळू शकेल. ही माहिती उद्बोधक व विचारप्रवृत्त करणारी आहे असे मला वाटते.

श्री. महाजन यांनी सूचीचे सहा विभाग (११६ पाने) केलेले आहेत व बोलकी अशी आठ परिशिष्टे दिली आहेत. (पाने ११७ ते १२७). ही पाहिली म्हणजे मागील पॅराग्राफच्या शेवटच्या दोन वाक्यांत केलेल्या दोन विधानांची सत्यता पटेल. सूचीचे विभाग प्रादेशिक तत्त्वावर केलेले आहेत व प्रत्येक विभागात कार्यकर्त्यांची नावे अकारविल्हे दिली आहेत. सर्व कार्यकर्त्यांची नावे देणारे परिशिष्ट देणे म्हणजे पृष्ठसंख्या वाढणार व खर्चही वाढणार म्हणून महाजन यांनी तो विचार सोडून दिला असावा. ग्रंथालय कार्यकर्त्यांची प्रादेशिक विभागणी हाच त्यांचा मुख्य मानस असल्या कारणाने त्यांनी अवलंबिलेला मार्ग रास्तच आहे असे वाटते. कार्यकर्त्यांची नावे देशी पद्धतीनेच दिलेली आहेत. पण काही ठिकाणी इंग्रजी पद्धतीची आद्याक्षरेच दिली आहेत (उदाहरणार्थ—जकाती, वी. सी., गडेकर, पी. डब्ल्यू. इत्यादि). याचे कारण विचारले असता श्री. महाजन यांनी मला आपली अडचण सांगितली, ती म्हणजे पुष्कळसा पत्रव्यवहार करूनसुद्धा अशी पूर्ण माहिती या व इतर बाबतीत मिळू शकली नाही व म्हणूनच त्यांनी उपलब्ध असलेल्या माहितीचा उपयोग केला. या अडचणींचे उल्लेख त्यांनी आपल्या संपादकीय निवेदनामध्ये केलेले आहेत.

या निवेदनानंतर श्री. महाजन यांनी सूचीच्या अनुषंगाने एक पृथक्करणात्मक व

विवेचनात्मक निबंध जोडलेला आहे व हे विवेचन त्यांनी " महाराष्ट्रातील ग्रंथपालनाची परंपरा ", " शैक्षणिक ग्रंथालये ", " ग्रंथालयीन शिक्षण ", " महाराष्ट्रातील ग्रंथालयीन कार्यकर्त्यांची परंपरा ", " सार्वजनिक कार्यकर्ते ", " ग्रंथालय चळवळीमधील कार्यकर्ते " अशा मुख्य मथळ्याखाली केलेले आहे. एकंदर अभ्यासावरून काढलेले निष्कर्ष या निबंधात दिले आहेत. काही निष्कर्ष निःसंदिग्ध शब्दांत मांडलेले आहेत. काही सूचित केलेले आहेत व काही मांडण्यासारखे व सूचित करण्यासारखे असून त्यांबद्दल त्यांनी मौनच पाळले आहे. या मौनाचे कारण म्हणजे हे निष्कर्ष त्यांच्या डोळ्यापुढे नव्हते असे नसून ते उघडपणे मांडण्यास काही मंडळाचा, काही समित्यांचा, काही कार्यकर्त्यांचा, काही पदसिद्ध व इतर अधिकाऱ्याचा होणारा संभाव्य रोष असावा असे मला वाटते. या सूचीच्या चोखंदळ वाचकांच्या ध्यानात असे निष्कर्ष आल्यावाचून राहणार नाहीत. ते यावयास पाहिजेतच व ग्रंथपालांची दुःखे समजून घेण्याची वृत्ती संबंधित विचारवंतात जोपासली गेली पाहिजे म्हणजे योग्य ग्रंथपालास, ग्रंथपालन तंत्रात पारंगत, ग्रंथालयीन सेवेत तत्पर, शिक्षणाने विद्येने भक्कम पण त्यांचे अवडंबर न करणारा अशा तिहेरी सिद्धतेच्या ग्रंथपालास संस्थेत मानाचे स्थान मिळविणे अवघड जाणार नाही असा मला विश्वास वाटतो. मे २६, १९६७ च्या टाइम्स ऑफ इंडिया मध्ये ( पान ८ कॉलम ५ ) श्री. जैन, जनरल सेक्रेटरी, कॉलेज लायब्रेरियन्स असोसिएशन, हैदराबाद, यानी महाविद्यालयीन ग्रंथपालांच्या एका दुःखास वाचा फोडली आहे व त्याचाच प्रतिध्वनी १९ जून १९६७ च्या टाइम्समधे ( पान ६ कॉलम ५ ) मुंबईच्या एका कॉलेज लायब्रेरियनने पाठविलेल्या पत्रात वाचावयास मिळतो. हा मुंबापुरस्थ ग्रंथपाल जैनांच्या पत्राचा हवाला २५।२७ मे असा का देतो हे मात्र मी समजू शकलो नाही. ( संदर्भ अचूक असावा हा ग्रंथपालन तंत्रांतील एक अवश्य दंडक, संशोधन क्षेत्रातही तसेच ). महाविद्यालयीन ग्रंथपालांचे हे दुःख म्हणजे—विद्यापीठ अनुदान मंडळाने सूचित केलेली वेतनश्रेणी या ग्रंथपालांना देण्यात आली खरी पण त्यांना लायब्ररी हेडक्लार्क या पलीकडे महाविद्यालयांच्या संसारात स्थान नाही. काही विद्यापीठातही अशीच परिस्थिती आहे अशी माझी माहिती आहे. या दोनही संस्थांतील ग्रंथपालांची वेतनश्रेणी आज समाधानकारक आहे, पण आज सार्वजनिक ग्रंथालये व पैझी कमिटीच्या शिफारशीनुसार निघालेली व सरकारी अनुदान मिळणारी जिल्हा व तालुका ग्रंथालये यांच्या ग्रंथपालांच्या वेतनश्रेणीकडे पाहिल्यास परिस्थिती तर फारच निराशाजनक अशीच दिसून येईल. शिवाय सरकारने दत्तक दिलेली प्रादेशिक ग्रंथालये, त्यांची वेतनश्रेणी काय आहे ? एका थोर शहरातील एक प्रादेशिक ग्रंथपाल परिस्थितीशी झगडून पिचून जरी गेला नसला तरी निराश झालेला असा मला माहीत आहे.

तेव्हा शेवटी आपल्या शालेय म्हणीकडेच यावे लागते. Money makes the mare go. तंडुल पाहिजेत, नुसत्या भव्य ग्रंथालयीन चळवळीचे आराखडे नकोत. या कठीण विषयावर विस्ताराने लिहिण्याचे झाल्यास Financing a dynamic library

Movement असा निबंधच सादर करावा लागेल म्हणून याविषयी किंचित् दिग्दर्शनच करतो. आज करवाढ अमाप अशी होत आहे तरी पण Library Cess बसविण्यास प्रांतिक सरकारे बद्धपरिकर झाली पाहिजेत. त्याचप्रमाणे समाजातील धनवान् घटकांनी आपल्या थैल्या जरा खुल्या केल्या पाहिजेत. मला तर एखादवेळेस वाटते की प्रांतिक सरकारांनी Library Grants Committees का स्थापू नयेत. ग्रंथालयीन अनुदानाचे कार्य अशा समित्यांकडून जबाबदारीने झाल्यास ग्रंथालयांच्या जोपासनेस नवजीवन मिळेल अशी माझी मोल्सट समजूत आहे. ग्रंथालयीन विश्वांतील कार्यकर्ते या सूचनेचा विचार करतीलच.



माझ्या मनोराज्यात एखादे भव्य जिल्हा ग्रंथालय तयार होते. अनेक विषयांवरील अनेक भाषांतील ग्रंथांनी ते समृद्ध असते. शहरातील अनेक वाचक त्याच्याकडे धाव घेत असतात व या आठवड्यात काय नवीन पुस्तके आली आहेत ती शेल्फवर पाहतात. ग्रंथपालाने या महिन्यात कोणत्या विद्वानांना व्याख्यानाकरता पकडले आहे याची चौकशी करतात. बाहेरगावाहून आलेल्या काही चौकस विद्वानांना ग्रंथपाल सागत असतो : "आमच्या जिल्ह्यातील ते तीन प्रसिद्ध लेखक ना ! त्यांनी लिहिलेली सर्व पुस्तके व त्यांच्या लिखाणावर लिहिलेले सर्व ग्रंथ 'या जिल्ह्याची शान' या कपाटात आपणास पहावयास मिळतील. इतकेच नव्हे तर त्यांच्या कवितांची, कादंबऱ्यांची व राजकारण व तत्वज्ञान या विषयावरील सर्व लिखाणांची हस्तलिखिते पण त्याच कपाटात सापडतील." चित्र अंधुक होत जाते व त्याचे जागी एक Nautical Engineering College ची लायब्ररी दिसू लागते. ग्रंथपाल विद्यार्थ्यांच्या पुढे Submarine चे आराखडे, चित्रे व नकाशे ठेवतो व नव्या भारताकरता त्यांनी पाणबुड्या बांधाव्या असे आवाहन देतो. मनःचक्षुपुढे अनेक चित्रे येऊन जातात. ही दुमदार तालुका लायब्ररी व हे तिचे बालवाचनालय. ही कार्यकर्त्यांची सभा. या आठवड्यात कोणत्या इस्पितळात कोणत्या पुस्तकांची व मासिकांची जरुरी आहे याचा विचार करीत आहे. हे जिल्ह्याचे ग्रंथालयीन कार्यकर्ते आपले खाजगी पण मोफत व सर्वांना खुले असणारे ग्रंथालय पुण्याहून तळेगावी नेऊन ते कसे सजवावे याचा विचार करीत आहे. आणि हा महाराष्ट्र ग्रंथालय संघाचा मोहरा महाजन व इतर ग्रंथपालांना सांगत आहे : आपण या ग्रंथपालन तंत्राबद्दल आपापली स्वबुद्धी मांडारे उघडा, प्रकाशनाची चिंता करू नका, ते आम्ही बघू.

ग्रंथालय सेवक म्हणून माझा संबंध या जीवनविभागाशी जरी वीस वर्षापूर्वीच सुटला असला तरी माझी ग्रंथालयीन शेखमहंमदी अधूनमधून चालूच असते हे वरील पॅराग्राफवरून दिसून येईल. माझा स्वतःचा खाजगी असा एक Sixth law of Library Science आहे. तो म्हणजे Just as the librarian builds the library, the Library builds the librarian. स्वप्नाळूपणाचेच लक्षण हे. अशा एका स्वप्नाळू

उर्मीत असतानाच श्री. महाजन यांनी या प्रस्तावनेविषयी विचारणा केली व ती लिहून देतो असे कबूल करण्याचे धाडसही मी केले. श्री. महाजन यांना प्रस्तावना वाचून Second Thoughts न सुचोत म्हणजे झाले. इत्यलम्.

डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट ॲंड रीसर्च इन्स्टिट्यूट,
पुणे ६. १–७–६७.

पु. म. जोशी

* * *

# संपादकीय निवेदन

महाराष्ट्रातील ग्रंथालय चळवळीचा इतिहास या विषयाचा गेली ४ वर्षे मी अभ्यास करीत आहे. अर्थात् त्यासाठी ग्रंथालय चळवळीतील विविध घटकांची माहिती जमा करणे आवश्यक होते. त्यानुसार ग्रंथालय चळवळीतील दोन घटक–ग्रंथालये व ग्रंथालय संघ–यांविषयीची माहिती जमा करून ती " महाराष्ट्रातील ग्रंथालयांची सूचि " या ग्रंथात सादर केली.

ग्रंथालय चळवळीमधील आणखी दोन घटक म्हणजे ग्रंथालयात काम करणारे ग्रंथपाल व इतर ग्रंथालय सेवक आणि ग्रंथालयांचा कारभार पाहणारी ग्रंथालय चालक मंडळी तसेच ग्रंथालय चळवळीचा पुरस्कार करणारे, ग्रंथालक संघात वा परिषदात भाग घेणारे सार्वजनिक कार्यकर्ते हे होत. यांची माहिती या सूचीमध्ये देण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळे महाराष्ट्रामध्ये किती व कोणत्या व्यक्ती ग्रंथालयव्यवसायात या चळवळी-मध्ये आहेत व त्यांनी केलेले कार्य यांविषयी एकत्रितपणे माहिती मिळू शकेल.

ग्रंथपाल व ग्रंथालयसेवक यांत ग्रंथपाल व त्याखालील हुद्याचे इतर सेवक (डेप्युटी लायब्रेरियन, साहाय्यक ग्रंथपाल, प्रमुख तालिकाकार, वरिष्ठ साहाय्यक, ग्रंथालय साहाय्यक ( ज्यूनियर असिस्टंट ), तांत्रिक ( तंत्रज्ञ ) साहाय्यक ( टेक्निकल असिस्टट ), ग्रंथालय लेखनिक, तसेच ग्रंथपालन विभागातील व्याख्याते ( लेक्चरर ) प्रपाठक ( रीडर्स ) यांचा समावेश केला आहे. मोठ्या ग्रंथालयातील टंकलेखक, हिशेबनीस वा तत्सम सेवकवर्ग तसेच कनिष्ठ सेवक वर्ग यांचा समावेश केला नाही.

ग्रंथालयीन कार्यकर्ते या सदरात ग्रंथालयांची चालक मंडळी तसेच ग्रंथालय संघात काम करणाऱ्या व्यक्तींचा समावेश केलेला आहे. यात सार्वजनिक ग्रंथालयाचे अध्यक्ष, उपाध्यक्ष, कार्याध्यक्ष, कार्यवाह, खजिनदार व कार्यकारी मंडळ सदस्य, तसेच ग्रंथालय परिषदाचे अध्यक्ष, कार्यवाह, ग्रंथालय संघांचे अध्यक्ष, उपाध्यक्ष, कार्यवाह, कोषाध्यक्ष, कार्यकारिणी सदस्य यांचा समावेश केला आहे. महाराष्ट्रामध्ये ७०० वर सार्वजनिक ग्रंथालये आहेत. या सर्वांची माहिती देणे हे सूचीच्या कक्षेबाहेर येत असल्या-कारणाने किमान सतत ५ वर्षे पदाधिकारी म्हणून काम करणाऱ्या वा ज्या कार्यकर्त्याने ग्रंथालयासाठी काही भरीव कार्य केले आहे व त्यातूनही **ज्यांचा ग्रंथालय परिषदांशी वा ग्रंथालय संघांशी संबंध आला आहे अशाच** व्यक्तींचा समावेश या सूचीत केला आहे.

आली नाही परंतु ज्यांची थोडीफार माहिती मला ग्रंथातून वा इतरत्र मिळू शकली तीही दिली आहे. परंतु हीही माहिती अपुरी वाटली म्हणून खामगाव येथे भरलेल्या महाराष्ट्र राज्य ग्रंथालय परिषदेच्या अनुषंगाने ( नोव्हें. १९६६ ) औरंगाबाद, अकोला, खामगाव व नागपूर येथे प्रत्यक्ष जाऊन माहिती जमा केली. परिषदेनिमित्त जमा झालेल्या प्रतिनिधीं-कडूनही माहिती मिळविली. त्यानंतर हैदराबादला भरलेल्या इयॅस्लिक परिषदेचे वेळी तसेच मुंबईलाहि एकदोन वेळा जाऊन बरीच माहिती जमा केली. जमा केलेल्या माहितीचे आधारे परत अनेकांना पत्रे पाठवून माहिती मिळविली. अशा तऱ्हेने सूची मध्ये अधिक व्यक्तींची माहिती देण्याचा व ती परिपूर्ण करण्याचा प्रयत्न केला आहे.

तरीसुद्धा ही सूची अपुरी आहे याची मला जाणीव आहे. विद्यापीठे, महाविद्यालये, विशेष ग्रंथालये यांना मी पत्रे पाठविली परंतु सर्व शाळांना पत्रे पाठविण्यात आली नाहीत. पुण्यातील प्रमुख शाळांना व प. महाराष्ट्रातील काहींना पत्रे पाठविली. मुंबई, मराठवाडा व विदर्भ येथील शालेय ग्रंथपालांची माहिती यात नाही. तसेच सर्व सार्वजनिक ग्रंथालयांनाहि पत्रे पाठविली नाहीत. केंद्रीय, प्रादेशिक, जिल्हा व काही तालुका व शहर वाचनालयांना पत्रे पाठविली. मला माहीत असलेल्या ग्रंथालय संघाच्या अनेक कार्यकर्त्यांना पत्रे पाठविली. यामुळे सूचीमध्ये महाराष्ट्रातील सर्व विभागातील संपूर्ण वा प्रातिनिधिक माहिती दिली गेली असे मी म्हणू शकणार नाही.

हा अपुरेपणा लक्षात घेऊन अजूनही ज्या व्यक्तींनी मला माहिती पाठविली नाही त्यांनी माहिती पाठवावी. ज्या व्यक्तींची माहिती या सूचीमध्ये आली नाही परंतु येणे आवश्यक आहे अशा व्यक्तींची माहिती मजकडे अवश्य पाठवावी. या सूचीमध्ये ज्या चुका असतील वा त्रुटी असतील त्याहि नजरेस आणून द्याव्यात.

## पूर्वींचे प्रयत्न

या पूर्वी ग्रंथालयांशी संबंधित व्यक्तींचे परिचय करून देण्याचे काही प्रयत्न झाले. पुणे नगर वाचन मंदिराच्या शतसांवत्सरिक महोत्सव प्रसंगी ( १९४९ ) " पुणे नगर वाचन मंदिराचा १०० वर्षांचा इतिहास " लिहिण्यात आला त्यामध्ये पुणे न. वा. मंदिराच्या १०० वर्षातील प्रमुख कार्यकर्त्यांचा तपशीलवार परिचय दिला आहे. मला वाटते महाराष्ट्रातील हा प्रथम प्रयत्न होय. परंतु हा प्रयत्न एका ग्रंथालयापुरताच मर्यादित होता.

नागपूरला भरलेल्या १२ व्या मराठी ग्रंथालय परिषदेच्या ( १९६१ ) निमित्ताने 'ग्रंथपाल' मासिकाचा विशेषांक काढून त्यांत वसंत जोशी यांनी " विदर्भातील ग्रंथपालांची सूचि " दिली आहे. हा दुसरा प्रयत्न होय.

पुणे येथे भरलेल्या १६ व्या महाराष्ट्र राज्य ग्रंथालय परिषदेनिमित्त ( १९६४ ) जी ग्रंथालय गौरविका प्रसिद्ध केली आहे त्यात श्री. महाजन यानी " पुण्यातील ग्रंथपाल, ग्रथालय सेवक आणि ग्रंथालय कार्यकर्ते " याची त्रोटक माहिती दिली आहे. हा तिसरा प्रयत्न होय.

भारतामध्येही या स्वरूपाचे काही प्रयत्न झाले आहेत. १९५१ मध्ये प्रसिद्ध झालेल्या डॉ. रंगनाथन् यांच्या इंडियन लायब्ररी डिरेक्टरीत ' लायब्रेरियन्स हूज हू ' दिला आहे. हा अखिल भारतीय स्वरूपाचा प्रथम प्रयत्न मानावा लागेल. परंतु यामध्ये फारच थोड्या व्यक्तींची माहिती आढळते. दिल्ली ग्रंथालय संघाने जी दिल्ली ग्रंथालय सूची १९६४ मध्ये प्रसिद्ध केली आहे त्यामध्ये दिल्लीतील ग्रंथपालांची त्रोटक माहिती दिली आहे. अगदी अलीकडचा प्रयत्न म्हणजे ' मेन ऑफ लायब्ररी सायन्स अँड लायब्ररीज इन इंडिया ' ( प्रीमियर पब्लिशर्स, नवी दिल्ली, १९६७ ), हा होय. यामध्ये भारतातील सुमारे ८००–९०० ग्रंथपाल व ग्रंथालय सेवकांची माहिती दिली आहे.

वरील निवेदनावरून लक्षात येईल की ग्रंथालयांशी संबंधित सर्व व्यक्तींची माहिती देण्याचा भारतीय पातळीवरून वा प्रादेशिक पातळीपर्यंत अद्यापपर्यंत प्रयत्न झालेला नाही. वरील प्रयत्नातील महत्त्वाचे वैगुण्य म्हणजे ज्या व्यक्तींनी माहिती पाठविली असेल त्यांचीच प्रामुख्याने माहिती दिली आहे. यामुळे महत्त्वाच्या व्यक्तींचीही माहिती वरील सूचीमध्ये मिळत नाही.

ही उणीव भरून काढण्याचा हा अल्पसा प्रयत्न आहे. एका राज्यातील सुमारे ९०० पर्यंत व्यक्तींचा परिचय करून देण्याचा हा भारतातील पहिलाच उपक्रम मानावा लागेल.

## सूचीची रचना व काही वैशिष्ट्ये

सूचीतील सर्व नोंदी अनुवर्णाप्रमाणे न लावता सूचीची रचना प्रादेशिक विभागाप्रमाणे केली आहे. त्यामुळे महत्त्वाच्या ठिकाणी एकूण किती व कोणत्या व्यक्ती आहेत याची चटकन माहिती मिळू शकते. ग्रंथालय संघांना ही रचना विशेष उपयोगी पडेल.

महाराष्ट्र राज्याप्रमाणेच महाराष्ट्र राज्याबाहेरील मराठी ग्रंथपालांचीही माहिती दिली आहे. त्यावरून महाराष्ट्राबाहेर कोणत्या व्यक्ती या व्यवसायामध्ये आहेत याची कल्पना येऊ शकेल.

हयात व्यक्तींबरोबरच दिवंगत व्यक्तींचीही माहिती देण्याचा प्रयत्न केला आहे. यात ग्रंथपालन व्यवसायातील अनेक दिवंगत व्यक्तींची अद्यापहि अप्रकाशित असलेली माहिती मराठी वाचकांना सादर केली आहे. या स्वरूपाचा एकत्रित माहिती देण्याचा प्रयत्न अद्यापपर्यंत झालेला माझे पाहण्यात नाही. बडोदा संस्थानातील काही जुन्या कार्यकर्त्यांचीही माहिती दिली आहे. यामुळे ग्रंथपालन व्यवसायातील प्रथम पाइकांची ओळख होऊ शकेल.

या सूचीला विविध परिशिष्टे जोडली आहेत. ती तयार करण्यासाठी फारच प्रयत्न करावे लागले आहेत. या परिशिष्टात जमा झालेल्या सर्व प्रकारच्या माहितीचे संकलन करून त्यांचे अनेक प्रकारे विश्लेषण केले आहे. त्यामुळे ग्रंथालय चळवळीतील विविध उपक्रमांची माहिती मिळू शकेल.

या सूचीला जोडलेला ग्रंथपाल व ग्रंथालय कार्यकर्ते यांच्या ... लेला निबंध ग्रंथपालनाची पूर्वपीठिका व ग्रंथालयचळवळीची पार्श्वभूमी व ... थोडाफार प्रकाश टाकू शकेल.

**ग्रंथालयीन कार्यकर्त्यांची** माहिती खालील क्रमाने दिली ... व्यक्तिनाम ( प्रथम आडनाव ) ( २ ) जन्मदिनांक ( ३ ) शिक्षण ( ४ ... ( ५ ) ग्रंथालयीन कार्य–संबंधित ग्रंथालयातील कार्य, ग्रंथालय संघातील ... चळवळीतील विविध उपक्रम व बहुमान ( ६ ) प्रकाशने–फक्त ... ( ७ ) पत्ता.

**ग्रंथपाल व ग्रंथालयसेवक** यांची माहिती खालील क्रमाने ... ( १ ) व्यक्तिनाम ( प्रथम आडनाव ) ( २ ) जन्मदिनांक ( ३ ) शिक्षण ... पदवी देणाऱ्या विद्यापीठाचे नाव, उत्तीर्ण वर्षे, काही बाबतीत श्रेणी व विषय खालील शिक्षणाची माहिती शक्यतो दिली नाही ). ( ४ ) ग्रंथपालनाचे प्रमाणपत्र, डिप्लोमा वा पदवी ( परीक्षा घेणाऱ्या संस्थेचे नाव व उत्तीर्ण वर्ष ); बहुमान. ( ५ ) ग्रंथालयीन कामाचा अनुभव : हुद्दा, ग्रंथालयाचे वा ... सेवा कालखंड याप्रमाणे कालक्रमानुसार माहिती ( ६ ) ग्रंथालयीन कार्य : ... तील विविध कार्ये, *ग्रंथपालन वर्ग, ग्रंथालय परिषदा, चर्चासत्रे यातील भाग व* ( ७ ) प्रकाशने–प्रथम पुस्तके व नंतर लेख, आकाशवाणीवर भाषणे ( ... ण्याचा पत्ता.

ही माहिती देताना खालील संक्षेप व प्रतिशब्द वापरले आहेत.

एम्. लिब्. एस्सी. : मास्टर ऑफ् लायब्ररी सायन्स
बी. लिब्. : बॅचेलर ऑफ लायब्ररी सायन्स
डिप्. लिब्. : डिप्लोमा इन लायब्ररी सायन्स
ज्यू. डिप्लोमा : ज्यूनियर डिप्लोमा
*ग्रं. प्र. : ग्रंथपालन प्रमाणपत्र ( सर्टिफिकेट )*
ग्रं. सा. ग्रं. ले. : ग्रंथालय साहाय्यक, लेखनिक ( लायब्ररी असिस्टंट, ज्यूनियर ...
साहा. ग्रंथपाल : साहाय्यक ( असिस्टंट ) ग्रंथपाल.
तंत्रज्ञ–तांत्रिक साहाय्यक : टेक्निकल असिस्टंट.

' ग्रं. ' ग्रंथालय संघ, ग्रंथपालन वर्ग, ग्रंथालय परिषदा, ग्रंथालयाचे नाव ... नावांचा संक्षेप केला आहे.

## आभार व ऋणनिर्देश

कोणत्याही सूचीचे कार्य अनेक व्यक्ती वा संस्थांच्या साहाय्याशिवाय पुरे ... शकत नाही. ही सूची तयार करतानाही मला अनेक व्यक्तींनी व संस्थांनी मदत ... आहे. त्यांचा ऋणनिर्देश करणे आवश्यक आहे.

पुणे विद्यापीठाने माझ्या अभ्यास योजनेस आर्थिक साहाय्य दिले म्हणूनच ही सूची सिद्ध होऊ शकली. आर्थिक साहाय्याविना हजारो लोकांशी पत्रव्यवहार करणे अशक्य होते. म्हणून पुणे विद्यापीठाचा मी अत्यंत ऋणी आहे.

महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघाचे कार्यवाह श्री. वा. वि. भट यांनी 'ग्रंथालय सूची' प्रमाणेच याही सूचीच्या कार्यास साहाय्य, मार्गदर्शन तसेच वारंवार प्रोत्साहन देऊन हे काम पुरे करून घेतले याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघाने सूचीच्या प्रकाशनाची जबाबदारी स्वीकारली याबद्दल महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघाच्या व्यवस्थापक मंडळाचा मी आभारी आहे.

महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघाने या सूचीचे हस्तलिखित तपासण्याचे काम मुंबईचे ग्रंथपाल श्री. शां. शं. रेगे यांचेकडे सोपविले होते. त्यांनी चिकित्सकपणे हस्तलिखित तपासून दिले याबद्दल मी अत्यंत आभारी आहे. हस्तलिखित तपासताना त्यांनी ज्या सूचना केल्या, अनेक व्यक्तींची माहिती दिली त्यामुळे या सूचीतील अनेक उणीवा दूर करण्यास मदत झाली आहे.

पुणे विद्यापीठ जयकर ग्रंथालयाचे ग्रंथपाल श्री. कृ. शं. हिंगवे व सह ग्रंथपाल डॉ. म. प. पेठे यांनी वेळोवेळी प्रोत्साहन व सहाय्य सहकार्य देऊन कामास चालना दिली याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे. जयकर ग्रंथालयातील सेवक श्री. कुंजीर याने मुद्रणप्रत तयार करण्यास मदत केली आहे.

या सूचीच्या प्रारंभी दिलेला निबंध लिहिण्यासाठी तसेच सूचीतील काही व्यक्तींची माहिती गोळा करण्यासाठी पुणे विद्यापीठ जयकर ग्रंथालय, फर्ग्युसन कॉलेज ग्रंथालय व गोखले इन्स्टिटयूट ग्रंथालयातील ग्रंथांचा फारच उपयोग झाला आहे.

या सूचीस प्रस्तावना लिहावी म्हणून महाराष्ट्रातील ग्रंथालय क्षेत्रातील ज्येष्ठ व अधिकारी व्यक्ती म्हणून मुंबई विद्यापीठाचे माजी ग्रंथपाल, मुंबई प्रांताचे माजी डायरेक्टर ऑफ आर्किव्हज व सध्या डेक्कन कॉलेजमधील इतिहासाचे प्राध्यापक डॉ. पुरुषोत्तम महादेव जोशी यांना मी विनंती केली. माझी विनंती मान्य करून त्यांनी या सूचीस विवेचक प्रस्तावना लिहिली याबद्दल मी आभारी आहे. प्रस्तावना लिहिताना सूचीच्या अनुषंगाने तसेच माझ्या प्रास्ताविक निबंधाच्या निमित्ताने महाराष्ट्रातील ग्रंथालय चळवळी संबंधी त्यांचेशी जी चर्चा झाली त्यातून मला मोलाचे मार्गदर्शन झाले आहे.

याशिवाय खालील व्यक्तींनी साहाय्य केल्याबद्दल मी ऋणी आहे.

( १ ) महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांचे ग्रंथपाल व तेथील ग्रंथालयसेवक विशेषतः मुंबईचे सर्वश्री. मार्डोल, अँडरसन, परुळेकर, नायडू, नागपूरचे सर्वश्री व. वि. कुलकर्णी, देशपांडे, औरंगाबादचे प्रा. गोरे व कट्टी, कोल्हापूरचे श्री. जकाती.

( २ ) मराठवाडा ग्रंथालय संघाचे सर्वश्री सराफ, वडजीकर, कुंद्रकर, प्रभृति कार्यकर्ते, विदर्भ ग्रंथालय संघाचे सर्वश्री फडके, देहाडराय.

या सूचीला जोडलेला ग्रंथपाल व ग्रंथालय कार्यकर्ते यांच्या परंपरेविषयी लिहिलेला निबंध ग्रंथपालनाची पूर्वपीठिका व ग्रंथालयचळवळीची पार्श्वभूमी व सद्यःस्थिती यावर थोडाफार प्रकाश टाकू शकेल.

**ग्रंथालयीन कार्यकर्त्यांची** माहिती खालील क्रमाने दिली आहे. (१) व्यक्तिनाम (प्रथम आडनाव) (२) जन्मदिनांक (३) शिक्षण (४) व्यवसाय (५) ग्रंथालयीन कार्य–संबंधित ग्रंथालयातील कार्य, ग्रंथालय संघातील कार्य, ग्रंथालय चळवळीतील विविध उपक्रम व बहुमान (६) प्रकाशने–फक्त ग्रंथालय संबंधी (७) पत्ता.

**ग्रंथपाल व ग्रंथालयसेवक** यांची माहिती खालील क्रमाने दिली आहे. (१) व्यक्तिनाम (प्रथम आडनाव) (२) जन्मदिनांक (३) शिक्षण : पदव्या, पदवी देणाऱ्या विद्यापीठाचे नाव, उत्तीर्ण वर्ष, काही बाबतीत श्रेणी व विषय. (पदवीखालील शिक्षणाची माहिती शक्यतो दिली नाही). (४) ग्रंथपालनाचे शिक्षण : *प्रमाणपत्र, डिप्लोमा वा पदवी (परीक्षा घेणाऱ्या संस्थेचे नाव व उत्तीर्ण वर्ष).* काही बहुमान. (५) ग्रंथालयीन कामाचा अनुभव : हुद्दा, ग्रंथालयाचे वा संस्थेचे नाव, सेवा कालखंड याप्रमाणे कालक्रमानुसार माहिती (६) ग्रंथालयीन कार्य : ग्रंथालय संघातील विविध कार्य, ग्रंथपालन वर्ग, ग्रंथालय परिषदा, चर्चासत्रे यातील भाग व बहुमान (७) प्रकाशने–प्रथम पुस्तके व नंतर लेख, आकाशवाणीवर भाषणे (८) राहण्याचा पत्ता.

ही माहिती देताना खालील संक्षेप व प्रतिशब्द वापरले आहेत.

एम्. लिब्. एस्सी. : मास्टर ऑफ् लायब्ररी सायन्स
बी. लिब्. : बॅचेलर ऑफ लायब्ररी सायन्स
डिप्. लिब्. : डिप्लोमा इन लायब्ररी सायन्स
ज्यू. डिप्लोमा : ज्यूनियर डिप्लोमा
ग्रं. प्र. : ग्रंथपालन प्रमाणपत्र (सर्टिफिकेट)
ग्रं. सा. ग्रं. ले. : ग्रंथालय साहाय्यक, लेखनिक (लायब्ररी असिस्टंट, ज्यूनिअर असिस्टंट)
साहा. ग्रंथपाल : साहाय्यक (असिस्टंट) ग्रंथपाल.
तंत्रज्ञ–तांत्रिक साहाय्यक : टेक्निकल असिस्टंट.

'ग्रं.' ग्रंथालय संघ, ग्रंथपालन वर्ग, ग्रंथालय परिषदा, ग्रंथालयाचे नाव याचे नावांचा संक्षेप केला आहे.

## आभार व ऋणनिर्देश

कोठल्याही सूचीचे कार्य अनेक व्यक्ती वा संस्थांच्या साहाय्याशिवाय पुरे होऊ शकत नाही. ही सूची *तयार करतानाही मला अनेक व्यक्तींनी व संस्थांनी मदत* केली आहे. त्यांचा ऋणनिर्देश करणे आवश्यक आहे.

पुणे विद्यापीठाने माझ्या अभ्यास योजनेस आर्थिक साहाय्य दिले म्हणूनच ही सूची सिद्ध होऊ शकली. आर्थिक साहाय्याविना हजारो लोकांशी पत्रव्यवहार करणे अशक्य होते. म्हणून पुणे विद्यापीठाचा मी अत्यंत ऋणी आहे.

महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघाचे कार्यवाह श्री. वा. वि. भट यांनी 'ग्रंथालय सूची' प्रमाणेच याही सूचीच्या कार्यास साहाय्य, मार्गदर्शन तसेच वारंवार प्रोत्साहन देऊन हे काम पुरे करून घेतले याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघाने सूचीच्या प्रकाशनाची जबाबदारी स्वीकारली याबद्दल महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघाच्या व्यवस्थापक मंडळाचा मी आभारी आहे.

महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघाने या सूचीचे हस्तलिखित तपासण्याचे काम मुंबईचे ग्रंथपाल श्री. शां. शं. रेगे यांचेकडे सोपविले होते. त्यांनी चिकित्सकपणे हस्तलिखित तपासून दिले याबद्दल मी अत्यंत आभारी आहे. हस्तलिखित तपासताना त्यांनी ज्या सूचना केल्या, अनेक व्यक्तींची माहिती दिली त्यामुळे या सूचीतील अनेक उणीवा दूर करण्यास मदत झाली आहे.

पुणे विद्यापीठ जयकर ग्रंथालयाचे ग्रंथपाल श्री. कृ. शं. हिंगवे व सह ग्रंथपाल डॉ. म. प. पेठे यांनी वेळोवेळी प्रोत्साहन व सहाय्य सहकार्य देऊन कामास चालना दिली याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे. जयकर ग्रंथालयातील सेवक श्री. कुंजीर याने मुद्रणप्रत तयार करण्यास मदत केली आहे.

या सूचीच्या प्रारंभी दिलेल्या निबंध लिहिण्यासाठी तसेच सूचीतील काही व्यक्तींची माहिती गोळा करण्यासाठी पुणे विद्यापीठ जयकर ग्रंथालय, फर्ग्युसन कॉलेज ग्रंथालय व गोखले इन्स्टिट्यूट ग्रंथालयातील ग्रंथांचा फारच उपयोग झाला आहे.

या सूचीस प्रस्तावना लिहावी म्हणून महाराष्ट्रातील ग्रंथालय क्षेत्रातील ज्येष्ठ व अधिकारी व्यक्ती म्हणून मुंबई विद्यापीठाचे माजी ग्रंथपाल, मुंबई प्रांताचे माजी डायरेक्टर ऑफ आर्किव्हज व सध्या डेकन कॉलेजमधील इतिहासाचे प्राध्यापक डॉ. पुरुषोत्तम महादेव जोशी यांना मी विनंती केली. माझी विनंती मान्य करून त्यांनी या सूचीस विवेचक प्रस्तावना लिहिली याबद्दल मी आभारी आहे. प्रस्तावना लिहिताना सूचीच्या अनुषंगाने तसेच माझ्या प्रास्ताविक निबंधाच्या निमित्ताने महाराष्ट्रातील ग्रंथालय चळवळी संबंधी त्यांचेशी जी चर्चा झाली त्यांतून मला मोलाचे मार्गदर्शन झाले आहे.

याशिवाय खालील व्यक्तींनी साहाय्य केल्याबद्दल मी ऋणी आहे.

(१) महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांचे ग्रंथपाल व तेथील ग्रंथालयसेवक विशेषतः मुंबईचे सर्वश्री. मार्शल, अँडरसन, परुळेकर, नायडू, नागपूरचे सर्वश्री व. वि. कुलकर्णी, देशपांडे, औरंगाबादचे प्रा. गोरे व कट्टी, कोल्हापूरचे श्री. जकाती.

(२) मराठवाडा ग्रंथालय संघाचे सर्वश्री सराफ, वडजीकर, कुंद्रकर, प्रभृति कार्यकर्ते, विदर्भ ग्रंथालय संघाचे सर्वश्री फडके, देहाडराय.

( ३ ) मध्यप्रदेशातील ग्रंथपालांची माहिती जमवून पाठविणारे इंदूरचे श्री. मोवे, कलकत्याचे श्री. दातार व श्री. जोशी,

( ४ ) पुण्याचे सर्वश्री वा. पु. कोल्हटकर, डॉ. पु. म. जोशी, र. श. पारखी, शं. ना. बर्वे, मुंबईच्या कु. कांता मेणकुरकर, वि. गो. फाटक, त्र्यं. दि. वाकनीस, साठे, व्यास, तळोद्याच्या सौ. मंदा बोडस, अकोल्याचे पोतदार व काळे.

( ५ ) माझ्या पत्रांना उत्तरे पाठविणाऱ्या सर्व व्यक्ती व संस्था.

आनंद मुद्रणालयाचे चालक श्री. दादासाहेब जोशी व मुद्रणालयातील सेवकवर्गाने छपाईचे काम सुबक व बिनचूक करून दिले याबद्दल धन्यवाद.

अक्षय्यतृतीया, शके १८८९
१२ मे १९६७

शां. ग. महाजन

# अनुक्रमणिका

परिशिष्टे :



* * *

# महाराष्ट्रातील ग्रंथपालनाची व ग्रंथालयीन कार्यकर्त्यांची परंपरा

( या निबंधात व्यक्त केलेली मते या निष्कर्ष हे लेखकाचे स्वतःचे असून महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघाच्या अधिकृत धोरणांशी अथवा मतांशी ते पूर्णांशाने सुसंगत असतीलच असे वाचकांनी मानू नये. )

## ( अ ) महाराष्ट्रातील ग्रंथपालनाची परंपरा

'ग्रंथपालन' हा सध्याच्या युगात 'व्यवसाय' म्हणून मान्यता पावत आहे. ग्रंथपालन म्हणजे ग्रंथालयाचा दैनंदिन अंतर्गत कारभार व व्यवस्था पाहणे ग्रंथसंग्रहित करणे, त्याची नोंद ठेवणे, वर्गीकरण, तालिकीकरण यांच्या साहाय्याने ग्रंथांची मांडणी करणे व ते वाचकांना उपलब्ध करून देणे, त्यांची देखरेख करणे व संदर्भसाहाय्याद्वारा वाचकाची सेवा करणे ही कामे प्रामुख्याने त्यात येतात. ही सर्व कामे हल्ली ग्रंथपाल व ग्रंथालयसेवक या व्यक्ती करतात. महाराष्ट्रामध्ये या व्यवसायात सध्या निरनिराळ्या ग्रंथालयात काम करण्याचा विविध व्यक्तींचा परिचय या सूचीद्वारा करून देण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु या व्यक्ती गेल्या ५०–६० वर्षांतील होत.

त्यापूर्वीच्या काळातही ग्रंथालये कोणत्याना कोणत्या स्वरूपात अस्तित्वात होती व त्यांची व्यवस्था कोणीतरी ( अर्थात् ग्रंथपाल ) पाहत असणारच. या जिज्ञासेने महाराष्ट्रातील ग्रंथपालनाचा पूर्वेतिहास जमा करू लागलो. या निबंधात महाराष्ट्रामध्ये पूर्वी ग्रंथपालनाचे कार्य कशा प्रकारे चालत असे, ग्रंथपाल व ग्रंथालयसेवक कोणकोण होते, ते काय काम करीत होते, त्यांचे शिक्षण, वेतनश्रेणी, दर्जा काय होता याची माहिती देत आहे. त्याचप्रमाणे जमा केलेल्या माहितीच्या आधारे गेल्या ५०।६० वर्षांत ग्रंथपालनाचा विकास कसकसा होत गेला व सध्या या व्यवसायाची स्थिती कशी आहे याचे विवेचन करण्याचा प्रयत्न करीत आहे.

ग्रंथपालाची जरूरी अनेक ग्रंथांचा संग्रह झाल्यावर लागते. आणि ग्रंथांचा संग्रह ग्रंथनिर्मितीनंतर होऊ शकतो. मराठी वाङ्मयाचा इतिहास चाळता ज्ञानेश्वरांच्या काळापासून मराठीमध्ये ग्रंथनिर्मिती होत गेलेली आढळते. महानुभाव पंथी व इतर अनेक संतांनी व पंडितांनी ग्रंथरचना केलेली आढळते. अर्थात ही ग्रंथरचना मर्यादित होती. मुद्रणकलेचा प्रसार न झाल्यामुळे ग्रंथ हे हस्तलिखित स्वरूपात असत. तसेच एका पुस्तकाच्या अनेक प्रती तयार करण्यास वेळ व पैसा बराच लागत असल्याकारणाने ग्रंथांचा संग्रह करण्यात

बऱ्याच अडचणी होत्या. विद्येचा प्रसार काही वर्गापुरताच मर्यादित असल्याकारणाने ग्रंथांचा संग्रह ग्रंथकार व नंतर त्यांचे वंशज, संत, महंतांच्या मठामध्ये व नंतर त्यांच्या शिष्य परिवाराकडे, तीर्थोपाध्ये, शास्त्री, कीर्तनकार, पुराणिक तसेच राज्यकर्ते, राजे महाराजे, सरदार, जहागीरदार यांसारख्या विद्येशी संबंधित वा समाजातील उच्च स्तरातील लोकांकडे केलेला आढळतो. त्या काळातील ग्रंथपालन म्हणजे असलेल्या ग्रंथांचे जतन करणें, आवश्यकता वाटेल तेव्हा ग्रंथाचे मालकाला ग्रंथ उपलब्ध करून देणें, वाळवी वगैरे कीटकापासून तसेच उपद्रवी वाचक वा संशोधकापासून रक्षण करणें एवढेच होते. ग्रंथाचा संग्रह लहान असल्याकारणाने ग्रंथाचे मालकच ही कामे करीत असत. पाठांतराच्या साहाय्याने पूर्वीचे ज्ञान पिढ्यानपिढ्या जतन करून ठेवण्याचेहि दृढ प्रयत्न अनेक ठिकाणी झालेले आढळतात.

अशी परिस्थिती असली तरी अनेक ग्रंथांचा संग्रह करण्याचा व त्यासाठी पूर्ण वेळ ग्रंथपाल नेमल्याचा पहिला प्रयत्न १६ शतकात झालेला आढळतो. विजापूरचा बादशहा 'अलि आदिलशहा' ( १ ला : १५५८–१५८० ) या ग्रंथप्रेमी राजाने आपल्या शाही किताबखान्याचा ग्रंथपाल किंवा क्यूरेटर म्हणून नादेडच्या शेष घराण्यातील **वामन अनंत**[1] याची नेमणूक १५६५ मध्ये केली होती. सुप्रसिद्ध महाराष्ट्र कवि वामन पंडित यांचे हे आजोबा होत.

त्यांस बादशहाकडून वार्षिक मुशाहिरा म्हणून एक हजार होन मिळत असत. ( होन हे सुमारे ५३ ग्रेन वजनाचे सुवर्ण नाणे होते. त्याची त्यावेळची किंमत ३½ रुपये होती. याचा अर्थ या शाही ग्रंथपालाचा पगार वार्षिक ३५०० रुपये त्या काळात होता. १५६५ च्या रुपयाची किंमत सध्याच्या १५ रुपयांइतकी होईल ).

समर्थ रामदासांनी महाराष्ट्रांत तसेच महाराष्ट्राबाहेरही अनेक मठ स्थापन केले व त्यामध्ये बऱ्याच हस्तलिखित ग्रंथांचा संग्रह झालेला आढळतो; या मठातील शिष्यपरिवार हे ग्रंथपालनाचे काम करीत असणार. त्याकाळचे हेच ग्रंथपाल होत.

त्यानंतर पेशवाईच्या कालखंडामध्ये ग्रंथसंग्रहाचा उद्योग मोठ्या उत्साहाने सुरू केलेला आढळतो. पेशव्यांनी आपल्या १८ कारखान्यात पुस्तकशाळेस स्थान दिले. त्यावर गोविंदपंत आपटे[2] नामक गृहस्थ प्रमुख कामगार होता. अनेक ठिकाणाहून हस्त-

---

1. P. M. Joshi : 'Ali Adil Shah I of Bijapur (1558–1580) and his Royal Librarian : two ruq'as (Journal of the Asiatic Society of Bombay, New Series, Sardh–S'atabdi special Volume, Vol. 31 and 32, 1956 aed 1957) P. 97–107.

वि. अं. कानोले : दोन विजापुरी फर्मानाचा परिचय ( वरील संदर्भ ) पृ. ३०९–३११.

२. वा. कृ. भावे : पेशवेकालीन महाराष्ट्र ( पुणे, वा. कृ. भावे, १९३५ ) पृ. ९९–११०.

लिखिते जमा करणें, त्यांच्या प्रती करून घेणें, ग्रंथांची देवाण घेवाण करणें, ग्रंथांचा हिशेव ठेवणें या सर्व गोष्टी त्यावेळच्या ग्रंथपालाला कराव्या लागत. अर्थात ही कामे दप्तरखान्याचे प्रमुख अधिकारी वा कारभारी तसेच कारकून मंडळी करीत असत. नारो शंकर, गोविंद कृष्ण, संभाजी जाधव, पिलाजी जाधव, सदाशिव कृष्ण आंबेकर, गोविंद-भट बर्वे[3] प्रभृतींचे उल्लेख यासंबंधात पेशवे दप्तरात आढळतात. या पुस्तकशाळेची व्यवस्था चांगल्या प्रकारे शनवारवाड्यात केलेली होती.

१८०५ मध्ये मराठीमधले पहिले पुस्तक श्रीरामपूरच्या मुद्रणालयात मुद्रित झाले व अशा तऱ्हेने मुद्रित ग्रंथांची निर्मिती होऊ लागली. एका पुस्तकाच्या अनेक प्रती थोड्या वेळामध्ये व पूर्वीपेक्षा कमी किंमतीमध्ये मिळू लागल्या. त्याच सुमारास मुंबईला 'लिटररी सोसायटी' स्थापन झाली व एका अर्थाने मुद्रित पुस्तकांची ग्रंथालये सुरू झाली. १८३८ नंतर महाराष्ट्रात अनेक ठिकाणी 'नेटिव्ह जनरल लायब्ऱ्या' स्थापन होऊ लागल्या. ही सर्व सार्वजनिक स्वरूपाची परंतु वर्गणी ग्रंथालये होत. यातील ग्रंथ-संग्रह वाढू लागला. वृत्तपत्रे, मासिके ग्रंथालयात येऊ लागली. आणि म्हणून या ग्रंथालयांचा दैनंदिन कारभार पाहण्यासाठी कारकून (अथवा ग्रंथपाल) नेमण्यात येऊ लागले. त्यांच्या त्यावेळच्या परिस्थितीवर प्रकाश टाकणारे खालील काही उतारे पाहा. त्यावरून ग्रंथ-पालाचे वेतन, शैक्षणिक पात्रता, दर्जा व ग्रंथालयातील कामकाज यांची काही कल्पना येऊ शकेल.

रत्नागिरी नेटिव्ह लायब्ररीच्या १८५५ च्या अहवालात जमाखर्च जो सादर केला आहे त्यात ग्रंथपालाचा पगार ६ रुपये दाखविला आहे. सर्वसाधारण त्यावेळच्या ग्रंथालयांच्या व्यवस्थेवर (एस्टॅब्लिशमेंट) १५० ते २०० रुपयेपर्यंत खर्च होत होता. यावरून हा पगार त्याकाळी ग्रंथपालाचा असावा असे अनुमान काढण्यास हरकत नाही. १८५४ साली सोलापूर नेटिव्ह जनरल लायब्ररीचे ग्रंथपाल म्हणून "गणेश वासुदेव (Ganesh Wasoodeo)" हे काम करीत होते. त्यांनाही ६ रुपये पगार होता. ६ रुपये पगारावर ग्रंथालयात काम करण्यास लायक माणूस मिळत नाही म्हणून १० रुपये पगार करावा अशी शिफारस त्याच अहवालात केली आहे. "The pay of the karkoon was originally fixed at six rupees per mensem, but finding it impossible to procure a man with the requisite qualification *for the salary, it has been deemed expedient to entertain a Librarian*, possessing a competent knowledge of English and Marathi, on Ten rupees per mensem,"

युरोपियन अधिकारी ग्रंथालयाचे सभासद असत. पत्रव्यवहारही सरकारशी इंग्रजीमध्ये चाले. म्हणून इंग्रजीचे ज्ञान आवश्यक होते एवढीच शैक्षणिक पात्रता त्यावेळच्या ग्रंथ-पालाला पुरी होती असे दिसते.

3. K. G. Nitsure : A critical study of the provision for welfare activities in the Maratha Empire (Ph. D. thesis. 1966) p. 47-54.

**पुणे नेटिव जनरल लायब्ररी** हे जुने तसेच समृद्ध वाचनालय. १८७०–७४ मध्ये तेथे गणेश मोरेश्वर सोहनी हे ग्रंथपाल होते. ते रजेवर गेले त्यावेळी त्यांचे जागी गणेश आबाजी आठवले यांना नेमले. या ग्रंथपालाचा पगार १८७० मध्ये फक्त १२ रुपये होता. १८७१ साली तो १५ रुपये केलेला आढळतो. त्याप्रमाणेच ग्रंथपालाकडून सिक्युरिटी रक्कम घ्यावी असे ठरविले आहे. १८७८ मध्ये रामचंद्र गंगाधर कर्वे यांची ग्रंथपाल म्हणून नेमणूक करून त्यांचेकडून १०० रुपये अनामत रक्कम घेतली होती.[४]

अर्थात् त्यावेळच्या सार्वजनिक ग्रंथालयांना एवढ्या शैक्षणिक पात्रतेचा व पगाराचा माणूस पुरेसा होता. कारण ग्रंथालयातील एकूण ग्रंथसंग्रह, नवीन ग्रंथखरेदी वाचकसंख्या व ग्रंथांची देवघेव या सर्व गोष्टी अल्प प्रमाणात होत होत्या. त्याची कल्पना खालील आकड्यावरून लक्षात येऊ शकेल.

१८६८–६९ मधील ग्रंथालय स्थिती

| ठिकाण | ग्रंथसंख्या सुरवातीस | नवीनग्रंथ भर | सभासद | ग्रंथ दिले | जमा | खर्च |
|---|---|---|---|---|---|---|
| पुणे | ३१०० | १८ | २१७ | १२७ | ८५४–३–० | ८२६–०–३ |
| अहमदनगर | ११५२ | ४५ | ५२ | २७५ | ३२५–१०–० | २५६–२–६ |
| नाशिक | ६८७ | १८१ | ६४ | ११३ | ९४१–२–४ | १९९७–१–१ |
| सातारा | २१२२ | ८७ | ९४ | १८५५ | १०३४–१५–० | १०१६–८–९ |

(डी. पी. आय. १८६९–७० वृत्तान्त)

## शैक्षणिक ग्रंथालये

महाराष्ट्रामध्ये प्रथम सार्वजनिक ग्रंथालये स्थापन झाली व नंतर शिक्षणाच्या प्रसाराबरोबर शैक्षणिक ग्रंथालये स्थापन झालेली आढळतात. सार्वजनिक ग्रंथालयाप्रमाणे शैक्षणिक ग्रंथालयात सुद्धा ग्रंथपाल नेमण्याबाबत उदासीनताच दिसून येते. त्याची शैक्षणिक पात्रता, वेतनश्रेणी व ग्रंथालयातील कामकाज यामध्ये फारसा बदल झालेला आढळत नाही. पुढील काही उदाहरणे त्यावेळच्या परिस्थितीवर प्रकाश टाकू शकतील.

पुण्याचे इंजिनियरिंग कॉलेजमध्ये अनेक वर्षे ग्रंथपालाची नेमणूक केलेली आढळत नाही. परंतु या प्रकारचा पूर्ण वेळ माणूस नेमणे आवश्यक आहे. याबद्दल १८७१–७२ च्या *वार्षिक वृत्तांतात* प्राचार्य खालीलप्रमाणे शिफारस करतात. "Next year, I hope that a small salary of Rs. 10 or 15 may be allowed

४. ग. न. श्रीगोंदेकर : पुणे नगर वाचन मंदिराचा शंभर वर्षांचा इतिहास १८४८–१९४८ (पुणे, १९४९). पृ. १०४.

to a librarian, an officer who is much needed in this College." १० ते १५ रुपये पगारावर ग्रंथपाल या अधिकाऱ्याची नेमणूक करावी अशी शिफारस केली आहे. तरीसुद्धा ग्रंथपालाची नेमणूक केलेली आढळत नाही. म्हणून १८७२-७३ सालच्या अहवालात प्राचार्य परत एकदा ग्रंथपाल नेमण्याबद्दल शिफारस करीत आहेत. यावेळी पगार मात्र १५ ते २० रुपये असावा अशी सूचना करतात.

ग्रंथपालाचा दर्जा अध्यापकासमान असावा असा सध्याचा मतप्रवाह आहे. १८५८-५९ मध्ये मात्र ग्रंथपालाचा दर्जा कारकुनाच्या खालचा मानला जात असावा. असे दिसते १८५८-५९ च्या पुणे कॉलेजच्या वार्षिक अहवालात कॉलेजमधील सेवकांनी सहकार्य केल्याबद्दल प्राचार्यांनी जो शेरा मारला आहे त्यात प्रथम कारकुनाचा व नंतर ग्रंथपालाचा उल्लेख केला आहे यावरून वाटते. "express my recognition of good services of the karkoon and the Librarian of the college."

**एल्फिन्स्टन कॉलेज** हे मुंबईतील प्रख्यात कॉलेज. १९१७-१८ मध्ये या कॉलेज ग्रंथालयाची तपासणी श्री. शार्प यांनी केली तेव्हा ५११ पुस्तके गहाळ झालेली आढळली. त्यावर खालील अभिप्राय व्यक्त करण्यात आला आहे. A Library of 10000 books aught not to be left in charge of a half-time librarian and a Hamal. A full time clerk is urgent needed. या ग्रंथालयाची व्यवस्था एक अर्धवेळ कारकून व एक हमाल यांच्याकडे सोपविली होती. या शिफारसीनुसार पूर्ण वेळ ग्रंथपालाची नेमणूक पुढे केली असावी. कारण १९१४-१५ च्या वार्षिक वृत्तांतात खालील उल्लेख आढळतो.

Monsieur Peltier has to proceed to France on the outbreak of war in August 1914, Mr. **Dalal**, the Librarian, very kindly undertook his work without remuneration in addition to his own duties.

जागतिक युद्ध सुरू झाले म्हणून पेल्टीयर नावाचे कॉलेजमधील अधिकारी ऑगस्ट १९१४ मध्ये फ्रान्सला रवाना झाले. त्यांच्या अनुपस्थितीत त्यांचे काम काहीही वेतन न घेता ग्रंथपाल श्री. दलाल यांनी केलेले आढळते.

**डेक्कन कॉलेज** हे पुण्यातील सर्वात जुने कॉलेज. तेथेही १८७२-७३ पासून ग्रंथपाल होता. याबद्दल डेक्कन कॉलेजच्या प्राचार्यांच्या वार्षिक वृत्तांतात उल्लेख आढळतो. १९१७ मध्ये डेक्कन कॉलेजचे ग्रंथपाल श्री. बी. ए. मोडी यांच्या निधनाबद्दल खेद व्यक्त केला आहे. त्याविषयी प्राचार्य लिहितात. "For more than 20 years he was a most faithful friend and servant to myself. He was proud of college and never spared himself in its service. He can never be quite replaced." ( डी. पी. आय. १९१२-१३ ते १९१६-१७ वार्षिक वृत्तान्त ).

**मुंबई विद्यापीठ ग्रंथालय** हे महाराष्ट्रातील एक महत्त्वाचे ग्रंथालय. ग्रंथसंग्रह बराच होता. परंतु १९१७ पर्यंत तेथे पूर्णवेळ ग्रंथपाल नव्हता. सुशिक्षित ग्रंथपाल हवा असला तर त्याला योग्य वेतन द्यावयास हवे याची चालकांना जाणीव होती परंतु रास्त वेतन देता येत नसल्याची कबुली खालील वाक्यावरून समजून येते.

"I may mention that something has been done to put our univ. Lib. in order and make it available to scholars. We want of course a scholarly and wellpaid Librarian but at present it is beyond our power to provide the necessary salary."

(डी. पी. आय. वार्षिक वृत्तांत १९१२–१३ ते १९१६–१७)

पुढे मुंबई विद्यापीठाने पूर्ण वेळ ग्रंथपाल नेमण्याचे ठरविले. त्याला ग्रंथपालनाचे शिक्षण घेण्यासाठी युरोपात पाठविले. परंतु त्यांचे आकस्मिकरीत्या निधन झाले. त्याविषयी खालील उल्लेख आढळतो. A Librarian was specially trained in Europe and was vigorously at work but his recent tragic death has deprived the university of the benefit of his training. हे गृहस्थ म्हणजे श्री. कुंटे हे होत.

त्यानंतर श्री. फेरवाणी व श्री. सबनीस यांनी ग्रंथपाल म्हणून काम पाहिले. ह्या व्यक्ति मॅट्रिक वा तत्सम इतक्याच शिकलेल्या होत्या. एशियाटिक सोसायटीचे श्री. गोठोस्कर व श्री. कापडी हे पदवीधर होते. (बी. ए., बी. एससी.) बडोद्याच्या सेंट्रल लायब्ररीचे कुडाळकर एम्. ए., एल्. एल्. बी. होते. याहून अधिक पदवीधर व्यक्ती १९२१ पर्यंत ग्रंथालय व्यवसायात नव्हत्या. त्यांची संख्याहि अत्यल्प होती हे खालील नावावरून लक्षात येईल.

## १९२० पर्यंतच्या व्यक्ती

कै. तिरवरेकर कै. गोठोस्कर कै. अ. र. देसाई (१९०८–५०), कै. बोर्डेन (१९१०–१३), कै. कुंटे (१९१३–१४), कै. कुडाळकर (१९१३–२१), कै. दत्त (१९१४–३३), कै. दंडवते (१९१५– ), कै. कापडी (१९१६–५१), कै. काका कोल्हटकर (१९१६–४७), कै. फेरवाणी (१९१८–२०), कै. राऊत (१९१८–५५), कै. सबनीस (१९२०–३५), कै. भोंमुले.

या कालखंडातील फारशा व्यक्ती आज हयात नाहीत. १९२१ ते १९३१ पर्यंतच्या कालखंडातहि वरील परिस्थितीमध्ये फारसा फरक झालेला आढळत नाही. विद्यापीठ, महाविद्यालये व काही जुनी सार्वजनिक वाचनालये यामध्येच पूर्ण वेळ ग्रंथपाल नेमलेले आढळतात. मॅट्रिक वा तत्सम शिक्षण घेतलेल्याच व्यक्ती ग्रंथालयाचे कामकाज पाहत होत्या हे पुढील नांवावरून लक्षात येईल.

### १९२१–३० दरम्यानच्या व्यक्ती

बा. गो. परांजपे, सांगली ( १९२२–५८ ), र. श. पारखी, पुणे ( १९२२–६१ ), मा. कृ. देठे, मुंबई ( १९२५–६४ ), रा. ह. नानल, पुणे ( १९२६–५६ ), पां. श्री. फडके, नागपूर ( १९२६–६१ ), ब. म. देव, पुणे ( १९२७–६४ ), वाणी, रावेर, जळगाव ( १९२८– ), श्रीगोंदेकर, पुणे ( १९२८ ), कै. रा. का. कुलकर्णी, मालेगाव ( १९२८–६३ ), वि. शं. होटे, नागपूर ( १९३०– )

१९३१ नंतर ही परिस्थिती पालटलेली आढळते. डॉ. पु.म. जोशी, श्री. या. मु. मुळे, श्री. त्र्यं. दि वाकनीस यासारख्या स्कॉलर लोकांनी ग्रंथपालन क्षेत्रात प्रवेश केला. परदेशांत जाऊन ग्रंथपालनातील शिक्षण वा अनुभवहि प्राप्त केला. आणि एका तऱ्हेने ग्रंथपालन व्यवसाय हा कारकुनीचा व्यवसाय नव्हे तर विद्वानांचा व्यवसाय आहे हे नवसत्य प्रस्थापित केले. १९३१ नंतरच्या कालखंडात काही पदवीधर लोकहि या व्यवसायात प्रवेश करते झाले हे या व्यवसायाविषयी समाजात काही प्रमाणात आकर्षण निर्माण झाल्याचे प्रमाण मानता येईल. असे असले तरी १९४३ पर्यंतच्या कालखंडात या व्यवसायात महत्त्वाच्या अशा ६०–७० वर व्यक्ती नव्हत्या. यावरून हा व्यवसाय किती बाल्यावस्थेत होता हे लक्षात येईल.

या कालखंडामध्ये विद्यापीठ, महाविद्यालये व संशोधन संस्थांच्या ग्रंथालयांत पूर्ण वेळ ग्रंथपाल नेमण्याचे प्रमाण वाढलेले आढळून येते.

### १९३१–४० या कालखंडातील व्यक्ती

| | |
|---|---|
| या. मु. मुळे, कलकत्ता ( १९३२ ), | शं. ना. बर्वे, पुणे ( १९३२ ), |
| हिं. का. व्यास, मुंबई ( १९३३ ), | वि. गो. दिवाकर, पुणे (१९ ) |
| कृ. ग. भागवत, पुणे ( १९३३ ), | त्र्यं. दि. वाकनीस, मुंबई (१९३३–६१), |
| याराणशीवार, आणि | स्टीव्हनसन, नागपूर ( १९३३ ) |
| नावर, मुंबई ( १९३५ ), | डॉ. पु. म. जोशी, पुणे (१९३५–४७) |
| अँडरसन, मुंबई ( १९३६ ) | कोकाटे, पुणे ( १९३६ ) |
| दे. शं. देशपांडे, मुंबई ( १९३७ ) | मुळ्ये, रत्नागिरी ( १९३७ ) |
| वि. ह. अभ्यंकर, पुणे ( १९३७ ) | म. ज. साने, पुणे ( १९३८ ) |
| जे. एम्. कानिटकर, दिल्ली ( १९३९ ), | कृ. शं. हिंगवे, पुणे ( १९३९ ), |
| ज. बा. बुधकर, आणि | द. वा. जोशी, पुणे ( १९४० ), |
| कै. दलाल ( १९४०–५८ ) | |

### १९४१–४३

| | |
|---|---|
| रू. के. गोरे, मुंबई, ( १९४१ ), | बोरगावकर, पुणे ( १९४१ ) |
| ग. नी. भवाळकर, नागपूर ( १९४२ ), | वाट्ये, मुंबई ( १९४२ ), |

भा. स. मुळे (१९४२), रा. श्री. शिरवळकर, आणि
कृ. द. पुराणिक, मुंबई (१९४३), वा. पु. कोल्हटकर, प्र. दि. कुलकर्णी,
गोटी, मु. वा. देशपांडे, भा. नी. पटवर्धन, वाईकर, पुणे (१९४३)

## ग्रंथपालन शिक्षण

एकूण भारतात सुरुवातीच्या काळामध्ये ग्रंथपालन शिक्षण घेण्याची सोय नव्हती म्हणून सर्वच ग्रंथपाल हे अनट्रेन्ड होते. १९१०–११ मध्ये बॉर्डेन यांनी बडोद्यास ग्रंथपालन वर्ग सुरु केला परंतु तो अल्पायुषीच ठरला. त्यानंतर स. प. चे काका कोल्हटकर यांनी लाहोर येथील पत्रव्यवहार अभ्यासक्रम पुरा केला. हे या दृष्टीने पहिले ट्रेन्ड ग्रंथपाल होत. त्यानतर श्री. पारखी यांनीहि कोलंबिया विद्यापीठाचा पत्रव्यवहार अभ्यासक्रम पुरा केला. त्यानंतर डॉ. रंगनाथन् यांनी मद्रास विद्यापीठात चालू केलेला प्रथम सर्टिफिकेट व नंतर डिप्लोमा अभ्यासक्रम काही लोकांनी पुरा केला. या कालखंडात इंपीरियल लायब्ररी, कलकत्ता येथील डिप्लोमा अभ्यासक्रमहि काहींनी पुरा केला. बडोद्याच्या केंद्रीय ग्रंथालयातील प्रात्यक्षिक शिक्षण अभ्यासक्रमहि श्री. जोशी व दिवाकर यांनी पुरा केला. याच कालखंडात ग्रंथपालनाचे शिक्षण घेण्यासाठी वा अनुभव प्राप्त करण्यासाठी परदेशातही काहीजण जाऊन आले. थोडक्यांत ग्रंथालयांच्या विकासाबरोबर ग्रंथपालन शिक्षणाची जरुरी वाटू लागली. त्यातील शिक्षण महाराष्ट्रात उपलब्ध नसलेमुळे परप्रांतांत वा परदेशातही शिक्षण घेऊन आले. अर्थात् या तऱ्हेने शिक्षण घेणे आर्थिक दृष्टया परवडणारे नव्हते म्हणून फारच थोड्या व्यक्ती शिक्षण घेऊन आलेल्या आढळतात.

## मुंबई विद्यापीठाचा ग्रंथपालनवर्ग

१९४३ मध्यें मुंबई विद्यापीठाने ग्रंथपालनाचा डिप्लोमा अभ्यासक्रम सुरू करून ग्रंथपालनाचे शिक्षण देण्याची सोय उपलब्ध करून दिली. हा ग्रंथपालनातील महत्वाचा टप्पा होय. या संधीचा फायदा घेऊन अनेक व्यक्ती ग्रंथपालनाचा डिप्लोमा घेऊ लागल्या. या डिप्लोमाधारकाना ग्रंथालयात नोकरी देताना प्राधान्य मिळू लागले. आणि म्हणून मुंबई बाहेरील अनेक होतकरू ग्रंथपाल ग्रंथपालनाचे शिक्षण मुंबईला जाऊन घेऊन आले. या वर्गामुळे ग्रंथालय शास्त्राचा अध्यापक वर्ग तयार होऊं लागला.

## स्वातंत्र्योत्तर कालखंड

१९४५ मध्यें दुसरें महायुद्ध संपल्यानंतर परत काँग्रेस मंत्रिमंडळ सत्तारूढ झाले. फैजी समितीच्या अहवालानुसार केंद्रीय, प्रादेशिक तसेंच जिल्हा, तालुका वाचनालयें स्थापन होऊं लागली. त्याचप्रमाणें शिक्षणाचा प्रसारही मोठ्या प्रमाणांत होऊं लागला. शिक्षणाच्या प्रसाराबरोबर नवीन विद्यापीठें, महाविद्यालयें, माध्यमिक शाळा,

स्थापन झाल्या. तांत्रिक शिक्षण देणाऱ्या व संशोधन संस्थाही स्थापन होऊन त्यांची संदर्भ ग्रंथालयें स्थापन होऊं लागली. महाराष्ट्र राज्य १९६० मध्यें स्थापन झाल्यावर विशेषतः महाराष्ट्र सरकारच्या पुरोगामी शैक्षणिक धोरणामुळें शिक्षणाचा तसेंच शैक्षणिक संस्थांचा व्याप जलद गतीनें वाढूं लागला. अशा तऱ्हेनें स्वातंत्र्योत्तर कालखंडामध्यें विविध प्रकारची ग्रंथालयें ठिकठिकाणी स्थापन होऊन त्यांचा विकास होऊं लागला. यामुळें पूर्ण वेळ काम करणाऱ्या ग्रंथपाल व ग्रंथालयसेवकांचें प्रमाणही वाढलेले आढळते. ग्रंथपालनाविषयीं कल्पनाहि बदललेल्या आढळतात. ग्रंथरक्षण हें पूर्वीचे उद्दिष्ट मागे पडून ग्रंथांचा जास्तीत जास्त उपयोग हें पुरोगामी उद्दिष्ट मान्य पावूं लागलें. अर्थात् यासाठी ग्रंथपाल हा अल्पशिक्षित न राहता उच्चशिक्षित असावा, ग्रंथपालनाचे तंत्र अवगत केलेला तसाच व्यावहारिक तंत्रहि जाणणारा असावा आणि अशा व्यक्ती मिळण्यासाठी त्यांना या व्यवसायांत आकर्षित करण्यासारखी रास्त वेतनश्रेणीहि दिली पाहिजे ही विचारसरणी मान्य होऊ लागली आहे. प्रशिक्षित ग्रंथपालहि आपापल्या ग्रंथालयांची मांडणी उत्तम तऱ्हेने करतांना आढळतात. त्याच बरोबर वाचकांची सेवा करून ग्रंथालयांचे महत्त्व व ग्रंथपालांची उपयुक्तता पटवून देण्याचा प्रयत्न करीत आहेत. अशा तऱ्हेने गेल्या २५ वर्षांत ग्रंथपालनाचा सर्वांगीण विकास होत असलेला आढळून येईल.

याला पुष्टि देण्यासाठीं जमविलेल्या माहितीचे विविध प्रकारांनी विश्लेषण खालील प्रकारे करतां येईल.

**ग्रंथालयसेवक संख्या**—स्वातंत्र्योत्तर कालखंडात ग्रंथालयाची वाढ झपाट्याने होत गेली आहे. ग्रंथालयांच्या वाढीबरोबर ग्रंथालयसेवकांची संख्या वाढत गेली. मुंबईमध्ये हे प्रमाण सर्वात जास्त आहे. त्याखालोखाल पुणे, नागपूर व औरंगाबाद येथे ग्रंथपाल आढळतात. त्यामध्येहि शैक्षणिक व संशोधन संस्थाच्या ग्रंथालयांत ग्रंथालयसेवकांचे प्रमाण वाढत आहे. प्रमुख ठिकाणी शालेय ग्रंथपालांची ही नेमणूक होत आहे. सार्वजनिक ग्रंथालयांमध्ये ग्रंथालयसेवक संख्या वाढत आहे परंतु वाढ अत्यल्प आहे. एकाच ग्रंथालयांत विविध हुद्द्यांचे अनेक सेवकहि काम करताना आढळतात. विद्यापीठ व काहीं संशोधन ग्रंथालयांत ही वाढ विशेषत्वाने होत आहे.

**शैक्षणिक पात्रता**—विद्यापीठ, महाविद्यालयें व विशेष ग्रंथालयांत पदवीधरांचे प्रमाण वाढत आहे. दोन वा अधिक पदव्या धारण करणाऱ्या व्यक्तीहि वाढत आहेत. शालेय ग्रंथालयांतहि पदवीधर ग्रंथपाल नेमल्यात आलेले आढळतात. सार्वजनिक ग्रंथालयांत मात्र ( फक्त कांहीं सोडून ) मॅट्रिक वा त्याहून कमी शिक्षण असलेले सेवक काम करीत आहेत. ग्रंथालयक्षेत्रांत प्रवेश करतांना कमी शिक्षण झालेले असले तरी नोकरी करीत असतां शैक्षणिक पात्रता वाढविण्याची उदाहरणे अनेक आहेत. कला पदवीधरांप्रमाणेच विज्ञान, वाणिज्य, शिक्षण, कायदा इ. विद्याशाखांचे पदवीधरही काम करीत आहेत.

**ग्रंथपालनाचे शिक्षण**—१९४३ मध्ये मुंबई विद्यापीठाने ग्रंथपालनाचा अभ्यासक्रम सुरू केल्यावर अनेक लोकांनी डिप्लोमा घेतला आहे. त्यानंतर नागपूर, पुणे, कोल्हापूर येथील विद्यापीठांनी तसेच श्री. ना. दा. ठा. विद्यापीठामध्ये सुरू केलेल्या ग्रं. वर्गात अनेकांनी शिक्षण घेतले आहे. मुंबई, पुणे तसेच विदर्भ व मराठवाडा ग्रंथालय संघांनी सुरू केलेल्या ग्रंथपालन वर्गातहि अनेकांनी शिक्षण घेतलेले आहे. डिप्. लिब्. अभ्यासक्रम बंद झाल्यावर बी. लिब् झालेलेही काही आहेत. डिप्लोमानंतरचे ग्रंथपालन शिक्षण देण्याची सोय महाराष्ट्रात नसल्यामुळे दिल्ली, बनारस येथें जाऊन मास्टर ऑफ लायब्ररी सायन्सचे उच्च शिक्षणहि काहींनीं संपादन केले आहे. परंतु ग्रंथपालनाचे शिक्षण घेण्यासाठी परदेशी गेलेल्यांचे प्रमाण मात्र खूपच कमी झाले आहे. प्रशिक्षित ग्रंथपालांमध्ये डिप्लोमा धारण करणारांची संख्या जास्त आहे. त्याखालोखाल प्रमाणपत्रे धारण करणाऱ्या व्यक्ती आहेत. एम्. लिब्. एस्सी. धारण करणारेही काहीजण आहेत. असे असले तरी अनट्रेन्ड ग्रंथालयसेवकांचीही संख्या दुर्लक्ष करण्यासारखी नाही. प्रथम प्रमाणपत्र धारण करुन नंतर डिप्लोमा धारण करणाऱ्यांची संख्याही बरीच आहे.

**ग्रंथालयीन कामाचा अनुभव**—ग्रंथालयांत नोकरीला लागल्यानंतर शैक्षणिक पात्रता वाढवीत जाण्याचे तसेच ग्रंथपालन शिक्षण घेण्याचे प्रमाणहि बरेच आहे. साहजिकच त्यामुळे एका ग्रंथालयात लहान हुद्द्यावरून मोठ्या हुद्द्यावर जाणारे ग्रंथपाल जसे आढळतात तसेच एका ग्रंथालयातून दुसऱ्या ग्रंथालयात जाणाऱ्याचे प्रमाणहि बरेच मोठे आहे. स्वतःचा उत्कर्ष साधण्यासाठी महाराष्ट्राबाहेर तसेच परदेशातही अनेक जण गेले आहेत. तरीसुद्धा महाराष्ट्र न सोडण्याची प्रवृत्ति बऱ्याच जणांमध्ये आढळून येते.

**ग्रंथालयशास्त्र अध्यापन**—ग्रंथपालनाच्या शिक्षणाच्या प्रसाराबरोबर ग्रंथालयशास्त्र शिकविणारे अध्यापकहि निर्माण होऊ लागले. अर्थात् ही जबाबदारी अनुभवी ग्रंथपालांनी स्वीकारली आहे. काही विद्यापीठांत आता ग्रंथालयशास्त्र विभागहि सुरू होत आहेत तेथे पूर्ण वेळ अध्यापकहि नेमले जात आहेत. याच्याशी संबंधित असा परीक्षकपदांवर वा ग्रंथपालनाच्या बोर्ड ऑफ स्टडीजवर समासद म्हणून ग्रंथपाल काम करीत आहेत.

**ग्रंथालयविषयक लिखाण**—ग्रंथालयशास्त्र, ग्रंथपालन तसेच ग्रंथालय चळवळ यावर विपुल लेखन ग्रंथपाल व ग्रंथालयसेवकांनी केलेले आढळते. 'साहित्य सहकार', 'ग्रंथपाल' व इतर ग्रंथालयशास्त्रविषयक नियतकालिकात, वृत्तपत्रात, तसेच ग्रंथालय परिषदा, चर्चासत्रे, परिसंवाद यानिमित्ताने ग्रंथपालांनी विविध विषयांवर लिखाण केले आहे. ग्रंथपालनावरील पुस्तकेही ग्रंथपालांनी लिहिली आहेत. ग्रंथालयशास्त्राशिवाय वाङ्मयाच्या इतर प्रांतातहि डॉ. डॉ. रेगे, वि. शं. पारगावकर, डॉ. ना. बर्वे, यशवंत रांजणकर, ग. नी. भगाव्कर, दातार, कु. मु. उजळंबकर, डॉ. पु. म. जोशी, डॉ. दळवी, डॉ. पेठे, दत्तू गोरे, प्रभृति ग्रंथपालांनी विहार केलेला आढळतो.

**ग्रंथालय संघ कार्य**—ग्रंथालय संघांच्या स्थापनेत व वाढीतहि ग्रंथपालांनी

भाग घेतलेला आहे. मुंबई ग्रंथालय संघाच्या स्थापनेत डॉ. पु. म. जोशी, कै. स. ल. कापडी, व्यास यांनी पुढाकार घेतला आहे तर पुणे ग्रंथालय संघाची स्थापना क. शं. हिंगवे, वा. पु. कोल्हटकर, र. रा. पारखी, प्रभृति ग्रंथपालांनी केली. विदर्भ ग्रंथालय संघाच्या स्थापनेत पां. श्री. फडके प्रभृति ग्रंथपालांनी तसेच मराठवाडा ग्रंथालय संघाच्या प्रतिष्ठापनेत रा. य. सराफ, वडजीकर, कुंदुरकर प्रभृति ग्रंथपालांनी भाग घेतला आहे. महाराष्ट्र ग्रंथालय संघाच्या स्थापनेत व विकासात अनेक ग्रंथपालांनी हातभार लावलेला आहे. इतर ग्रंथालय संघाच्या ग्रं. वर्ग, ग्रंथालय परिषदा यांसारख्या कार्यक्रमांमध्ये ग्रंथपाल गेली १७।१८ वर्षे अधिक संख्येने भाग घेऊं लागले आहेत. भारतीय पातळीवरील ग्रंथालय संघटनामध्ये तसेंच चर्चासत्रे, परिसंवाद यांमध्ये ग्रंथपाल भाग घेऊन चमकूं लागले आहेत.

**परदेशप्रवास, निरीक्षण दौरा**—स्वातंत्र्योत्तर कालखंडांत ग्रंथपालनाचे शिक्षणासाठी परदेशात गेलेल्या व्यक्ती फारच थोड्या आहेत. परंतु इंडिया व्हीटलोन योजना, ब्रिटिश कौन्सिल, एशिया फौंडेशन, तसेच इंटर्नशिप योजना यांचे कार्यक्रमानुसार कांही व्यक्ती परदेशात जाऊन तेथील ग्रंथालयांची पाहणी करून आलेले आहेत. या ज्ञानाचा व अनुभवाचा उपयोग ग्रंथपालनाच्या विविध दालनात करतांना आढळतात.

**ग्रंथपालांची वेतन श्रेणी**–ग्रंथपालांची वेतनश्रेणी हा नाजूक परंतु तितकाच महत्त्वाचा प्रश्न आहे. याविषयीची माहिती मी जमा केली आहे परंतु प्रसिद्ध केली नाही. तिच्या आधारे ग्रंथपालांची वेतनश्रेणी सुधारत आहे एवढेंच सध्या म्हणता येईल. विद्यापीठ अनुदान मंडळाच्या शिफारसीनुसार विद्यापीठातील ग्रंथपाल व ग्रंथालयसेवक यांची वेतनश्रेणी सुधारली आहे आणि प्राध्यापकांच्या पातळीवर ही वेतनश्रेणी निश्चित केली आहे. महाविद्यालयीन प्रशिक्षित ग्रंथपालांना व्याख्यात्याइतकी वेतनश्रेणी द्यावी हे तत्त्व पुणे, मुंबई, शिवाजी, मराठवाडा या विद्यापीठांनी मान्य केलेले आढळते परंतु या तत्त्वाची नीटपणे अंमलबजावणी झालेली नाही. याच गटातील सरकारने चालविलेल्या स्थापत्य, विधि, शेती, वैद्यक वगैरेसारख्या संस्थांत मात्र ही वेतनश्रेणी अजूनहि मान्य झालेली नाही. संशोधन व विशेष ग्रंथालयांत मात्र वेतनश्रेणी सुधारत आहे परंतु अजूनही तेथे वाढील वाव आहे.

भारत सरकार व महाराष्ट्र सरकारच्या विविध खात्यांमध्येही वेतनश्रेणीत फरक दिसत आहे. आणि तुलनात्मक दृष्ट्या खासगी संस्थापेक्षा तेथील वेतनश्रेणी कमी आहे. शालेय ग्रंथालयांत ग्रंथपाल हा नॉन टीचिंग स्टाफ धरला जात असल्यामुळे तेथील सेवकांची वेतनश्रेणी लेखनिकासमानच आढळते. फारच थोड्या ठिकाणी शिक्षकांइतकी वेतनश्रेणी मिळत आहे. सार्वजनिक ग्रंथालयातील वेतनश्रेणी ही सर्वांत कमी आहे. १० ते २० रुपये पगारावर अनेक व्यक्ती काम करतांना आढळतात. या पगारावर काम करण्यास काही पेन्शनर मंडळीच तयार झालेली दिसतात. आणि म्हणूनच जास्त शिकलेली माणसे या ग्रंथालयात आढळत नाहीत.

**महिलांचें प्रमाण**—या व्यवसायात पूर्वी महिला नव्हत्या. परंतु सध्या महिलांचे प्रमाण वाढत आहे. शाळेमधून किंवा मोठमोठ्या ग्रंथालयांत दुय्यम हुद्यावर त्या काम करीत आहेत. महिलांच्याहि अनेक शिक्षणसंस्था निघाल्या आहेत. त्यामध्ये महिला ग्रंथपाल काम करताना आढळतात. श्री. ना. दा. टा. विद्यापीठाने ग्रंथपालनाचा अभ्यासक्रम सुरू करून अनेक महिलांना ग्रंथपालनाचे शिक्षण दिले आहे. मुंबईमध्ये महिलांचे हे प्रमाण जास्त आहे.

**ग्रंथपालांची प्रतिष्ठा वा दर्जा**—वेतनश्रेणी आणि प्रतिष्ठा वा दर्जा यांचा परस्परसंबंध आहे. जेथे जेथे ग्रंथपालाचे वेतन अल्प आहे तेथे तेथे ग्रंथपालाचा दर्जा हा कमी महत्त्वाचा मानला जात आहे. विद्यापीठ अनुदान मंडळाने अध्यापकासमान ग्रंथालय सेवकांना मानून वेतनश्रेणी जरी दिली असली तरीही प्रत्यक्षांत अध्यापकाइतका दर्जा मिळाला नाही ही वस्तुस्थिती आहे. मग प्रतिष्ठेची बाबच सोडा. आज काही ठिकाणी ग्रंथपालांना जो दर्जा प्राप्त झालेला आहे तो त्यांच्या व्यक्तिगत गुणावर व कर्तृत्वावर तसेच ग्रंथालयचालकाचा पुरोगामी दृष्टिकोन यामुळेच मिळालेला आढळतो. अशी अपवादात्मक उदाहरणे सोडता, ग्रंथपालनाचा दर्जा अजूनही सन्मानाप्रत गेलेला नाही ही वस्तुस्थिती आहे. आणि म्हणून या व्यवसायाला प्रतिष्ठा प्राप्त करून देण्यासाठी सध्या निरनिराळ्या ग्रंथालयांत काम करणाऱ्या सेवकांनी महान् परिश्रम व प्रयत्न करावयास हवेत.

## ( आ ) महाराष्ट्रातील ग्रंथालयीन कार्यकर्त्यांची परंपरा

वाचक आणि पुस्तक यांची भेट घडवून आणणाऱ्या ग्रंथपाल व ग्रंथालयसेवक यांची पूर्वपीठिका व सद्यःस्थिति यांचें विवेचन मागील निबंधात केले आहे. या निबंधांत ग्रंथालयांची स्थापना, त्यांचे संवर्धन, आणि कार्यविस्तार करण्याचे प्रयत्न करणाऱ्या ग्रंथालयीन कार्यकर्त्यांची परंपरा महाराष्ट्रामध्यें अशी निर्माण झाली, त्यांनी कसकसे प्रयत्न केले यांचा आढावा घेण्याचा प्रयत्न करीत आहे. तसेंच अलीकडच्या काळात ग्रंथालय संघ व ग्रंथालय परिषदा यामध्यें भाग घेऊन ग्रंथालय चळवळीचा प्रसार व प्रचार करणाऱ्या अशा कार्यकर्त्यांच्या कार्याचा स्थूलमानाने परामर्श घेत आहे.

ग्रंथालयीन कार्यकर्ते हा शब्द ग्रंथालयाचे संस्थापक, चालक, मालक व पालक या चारही अर्थाने वापरलेला आहे. पूर्वीच्या काळीं ग्रंथालयाचे संस्थापक हेच त्याचे चालक मालक व पालक असत. तदनंतरच्या काळात चालक वा मालक याचे अर्थ बदलत गेले आणि सध्यांच्या युगात लोकनियुक्त सरकार वा त्यांचे प्रतिनिधि हे च ग्रंथालयांचे चालक वा पालक बनत चालले आहेत व सर्वसामान्य जनता मालक बनत चालली आहे. या दृष्टिकोणांतून ग्रंथालयीन कार्यकर्त्यांचे तीन प्रमुख वर्ग करण्यास हरकत नाहीं ते असे.

( १ ) **राज्यकर्ते :** पूर्वीच्या काळांत राजे महाराजे, सरदार, जहागीरदार हे राज्यकर्ते होते. नंतरच्या काळांत पेशवे राज्यकर्ते बनले. ब्रिटिशांच्या काळांत राज्यकर्ते याचा अर्थ राजाचे प्रतिनिधि असा करावयास हवा. मांडलिक संस्थानिक हेहि राज्यकर्तेच होत. १९३५ नंतर विशेषतः स्वातंत्र्योत्तर कालखंडांत लोकनियुक्त सरकार स्थापन झाल्यामुळे शासन व त्यांचे प्रतिनिधि वा अधिकारी हेच राज्यकर्ते मानावे लागतील.

२ ) **सार्वजनिक कार्यकर्ते :** ग्रंथालय व वाचनप्रेमी सर्व व्यक्ती : सर्वसामान्य वाचक, अभ्यासक, अध्यापक, साहित्यिक, वृत्तपत्रकार, लोकशिक्षणप्रेमी समाजसेवक, राजकारणी लोकनेते तसेच विविध प्रकारचे देणगीदार.

३ ) **ग्रंथालय चळवळींतील कार्यकर्ते :** ग्रंथालय परिषदा व ग्रंथालयसंघ यांचे कार्यात भाग घेणाऱ्या सर्व व्यक्ती.

ज्ञानेश्वरांच्या काळापासून मराठीमध्ये ग्रंथनिर्मिती जरी सुरू झाली तरी अनेक ग्रंथांचा संग्रह करण्याचे फारसे प्रयत्न झालेले आढळत नाहीत. महानुभावीय पंथीयांनी काही ग्रंथसंग्रह केला असावा. परतु मोठ्या प्रमाणावर ग्रंथसंग्रह केल्याचा उल्लेख १६ व्या शतकांत आढळतो.

विजापूरचा बादशहा '**अलि अदिलशाह**' ( १ ला : १५५८–१५८१ ) याला वाचनाचा छंद होता व त्यामुळे त्याने अनेक ग्रंथ जमा करून ठेवले होते. ग्रंथ-संग्रह वाढविण्यासाठी त्याने ग्रंथलेखक, ग्रंथबंधक ( बाइंडर्स ), चित्रकार, कलावंत यासारखे जवळजवळ ६० लोक संग्रही ठेवले होते. राज्यामध्ये प्रवास करताना वा लढाईच्या मोहिमेतसुद्धा ग्रंथांच्या पेट्या तो स्वतःजवळ बाळगीत असे इतके त्याचे ग्रंथप्रेम होते. त्याचे ग्रंथालय "**शाही किताबखाना**" किंवा "**महेल किताबखाना**" या नावाने ओळखले जात असे. या किताबखान्याच्या ग्रंथपालपदी वामन पंडितांचे आजोबा वामन अनंत यांची वार्षिक १००० होन या पगारावर नेमणूक केली होती.[५]

## ग्रंथालय संघटक श्री समर्थ रामदास

यानंतर मोठ्या प्रमाणावर ग्रंथसंग्रह करण्याचा प्रयत्न श्री समर्थांनी केलेला आढळतो. श्री समर्थ रामदासांनी धर्मकारणाबरोबर राजकारणहि केले. तसेच ग्रंथकारणहि केलेले आढळते. रामदासांनी स्वतः समर्थ ग्रंथरचना केली आहे. त्यातील अनेक श्लोक आज महाराष्ट्रातील जनतेच्या जिव्हेवर आहेत. श्री समर्थांचे वाचन फार दांडगे असले पाहिजे. ते जेथे जात तेथे असलेल्या सत्पुरुषांच्या, योग्यांच्या, सिद्धांच्या भेटी घेत आणि होऊन गेलेल्यांच्या समाधीचे दर्शन घेत आणि त्यांचे ग्रंथ तर अवलोकन करीतच. पण त्याच्या प्रतीहि संग्रहार्थ मिळवीत. श्रीसमर्थ अंबाजोगाई जवळील बुटेटेकडीवर गेले

५. तळटीप १ पृष्ठ १८ पहा.

असता तेथे मुकुंद राजांचा विवेकसिंधु ग्रंथ वाचला व संग्रहार्थ त्याची प्रत मिळविली असा उल्लेख आढळतो.[६]

श्रीसमर्थांनी भरतखंडभर ११०० मठ स्थापन केले होते व हे सारे मठ एका अर्थाने विद्यापीठे वा श्रीसमर्थ विद्यालये होती. त्याकाळी छापखाने नव्हते. त्यामुळे पाहिजे असतील त्या ग्रंथांच्या नकला करून घ्याव्या लागत. त्यासाठी प्रत्येक मठात लेखनक्रिया अखंड चालू असे. श्रीसमर्थांचे वाङ्मय प्रत्येक मठात बहुधा संपूर्ण असे, पण परंपरेने जे मठपति होत, ते आणि त्यांचे शिष्य आपापल्या आवडीप्रमाणे इतरांचेहि ग्रंथ लिहून काढून मठात त्यांचा संग्रह करीत असत. श्रीसमर्थांनी आपल्या सर्व शिष्यांना तो एक दंडकच घालून दिला होता. त्यामुळे लिहावे कसे, लेखनाचे साहित्य काय असावे, रेखाटावे कसे येथपासून तो पुस्तकांना जपावे कसे येथपर्यंत श्रीसमर्थांना शिकवण द्यावी लागली. त्या शिकवणीचे स्वतंत्र समास दासबोधात आहेत. करुणाष्टकातहि एक श्लोक आढळतो.[७]

त्या काळच्या ग्रंथकारांचे ग्रंथ चाफळास मुख्य मठात आणि गिरीधरांच्या बीड येथील मठात होते. याशिवाय आत्मारामहाराजांचा येळ्ळेहाळी येथील मठ, तंजावर येथील भीमस्वामींचा मठ, तिसंगांव येथील दिनकराचा मठ, डोमगांव येथील कल्याण-स्वामींचा मठ या प्रमुख मठात अनेकविध ग्रंथसंग्रह मिळतो. सांप्रत विद्यमान असलेल्या बहुतेक मठांतील महत्त्वाचा संग्रह आज एकत्रित होऊन धुळे येथील श्रीसमर्थ वाग्देवता मंदिरात सुरक्षित येऊन बसला आहे. त्या संग्रहातील १८७५ बाडांची वर्णनात्मक यादी श्रीरामदासी संशोधन या नावाने सुमारे हजार-अकराशे पृष्ठांच्या दोन खंडात प्रसिद्ध आहे. या मंदिरात बृहन्महाराष्ट्रात होऊन गेलेल्या सर्व सत्पुरुषाचे काही ना काही वाङ्मय आहेच. त्यांत मुळीच नाही असा शक १७४० पूर्वीचा कोणीच विख्यात ग्रंथकार बाहेर राहिला नाही.[८]

**तंजावरचे सरस्वतीमहाल ग्रंथालय**–हें भारतातील नव्हे तर जगातील महत्त्वाच्या ग्रंथालयांपैकी एक गणले जाते. येथील ग्रंथसंग्रह शतकानुशतकें तंजावरच्या राज्यकर्त्यांनी मेहनतीने करून ठेवलेला आहे. प्रथम चोल राजांनी थोडा फार ग्रंथसंग्रह केला. त्यानंतरच्या नायक राजांनी १५३२ ते १६७३ पर्यंतच्या कालखंडात ग्रंथसंग्रह वाढविला. नायक राजांनी स्वतः रचिलेले अनेक ग्रंथ आजहि सरस्वतीमहालांत सापडतात. त्यानंतर मराठ्यांची सत्ता तंजावरला प्रस्थापित झाली. शिवाजी महाराजांचे सावत्र बंधू

६. शंकर श्रीकृष्ण देव : श्रीसमर्थावतार (श्रीसमर्थचरित्र, खं १, मुंबई, के. भि. ढवळे, १९ ) पृ. २२९, ४४७

७. श्री दासबोध, दशक ७ समास ९; दशक १९ समास १. करुणाष्टके, १५४।४०.

८. शं. श्री. देव : श्रीसमर्थहृदय (श्रीसमर्थचरित्र, खं २ ) पृ. २२७

व्यंकोजी ( एकोजी ) हे तंजावरचे पहिले मराठी राजे ( १६७६–१६८३ ). व्यंकोजीच्या नंतर आलेले सर्वच मराठे राजे विद्याप्रेमी तसेच ग्रंथप्रेमी होते. त्यातीलही राजे **शरफोजी** हे सर्वात ग्रंथप्रेमी राजे. ( १७९८–१८३२ ). त्यांना अनेक भाषा येत होत्या. मराठी व संस्कृत यावर प्रभुत्व होते. तसेच ते सदासर्वदा वाचन, लेखन व संशोधन करण्यात वेळ घालवीत असत. या ग्रंथालयांत त्यांनी तामिळ, संस्कृत, प्राकृत ( मराठी ) हजारों हस्तलिखितांचा संग्रह केलेला आढळतो. त्याचप्रमाणे इंग्रजी, फ्रेंच यासारख्या भाषांतील मौल्यवान तसेच दुर्मिळ ग्रंथ, अनेक ग्रंथांच्या पहिल्या आवृत्त्या जमवून आणून ठेविल्या. या सर्व ग्रंथांवर महाराजांच्या स्वाक्षऱ्या आहेत. ग्रंथांबरोबरच निरनिराळ्या तसिरी व चित्रे, नाणी, विविध वस्तु, घोडे, पोषाख, युद्ध, अस्त्रे यांचाहि मौल्यवान संग्रह येथें आढळतो. १९१८ मध्ये राजांनी हे ग्रंथालय जनतेच्या ताब्यांत दिले व विश्वस्तांकरवी कारभार होऊं शकला. ग्रंथालयाचा कारभार पाहण्यासाठी १ लक्ष रुपयांचे मूलधनही दिले. सध्या हे ग्रंथालय मद्रास सरकारच्या ताब्यांत असून कोणालाहि तेथें अभ्यास करता येतो.[९]

**छत्रपती शाहु** महाराजांच्या कारकीर्दीत मराठी राज्याला थोडेफार स्वास्थ्य प्राप्त झाले होते. त्यामुळे त्यांनी ग्रंथसंग्रहास प्रारंभ केला. पेशवे हेहि विद्याप्रेमी होते. वाचनाचा छंद त्यांना होता. म्हणून त्यांनी राज्यकारभारांतील १८ कारखान्यांत **पुस्तकशाळेलाहि** स्थान दिले. पेशवे ज्यावेळी स्वारीवर जात त्यावेळी उपलब्ध असलेल्या ग्रंथांबद्दल चौकशी करून त्याची प्रत करून ती पुस्तकशाळेकडे पाठविण्यास सांगत. काही ग्रंथ विकत मिळाले तर त्याची किंमत देऊन विकत घेत. या तऱ्हेने जे ग्रंथ मिळत नसत त्यासाठी आपली माणसे पाठवून ग्रंथांच्या नकला करून आणीत.[१०] आणि म्हणून त्याकाळीं ग्रंथविक्रीचा वा ग्रंथ नकलण्याचा व्यवसायहि जोरात चालत असे.[११] या काळात ग्रंथांची देवघेवहि होत असे. शनवारवाडा बांधल्यावर तेथे पुस्तकशाळेची व्यवस्था करण्यात आली व त्यावर कारभारीही नेमले होते. अशा तऱ्हेने राज्यकर्त्यांनी अनेकविध ग्रंथांचा संग्रह करून ठेवलेला आढळतो. पेशवाई नष्ट झाल्यानंतर हा सर्व हस्तलिखित ग्रंथांचा संग्रह इंग्रजांनी दक्षिणा फंडातून चालविलेल्या संस्कृत पाठशाळेकडे दिला. त्यानंतर कालांतराने हा संग्रह डेक्कन कॉलेजकडे आला. १९३४ मध्ये डेक्कन कॉलेज बंद

---

९. एस्. गोपालन् : तंजावर सरस्वतीमहालाचे धावते दर्शन अनु. नागराजराव ( तंजावर, सरस्वतीमहाल ग्रंथालय, १९६० ).

10. C. G. Karve : Manuscript-Curatorship under the Marathas ( in Prof. P. K. Gode Commem oration Volume, Poona, 1960 ) p.–199-202.

११. ना. गो. चापेकर : पेशवाईच्या सावलीत ( पुणे. ल. ना. चापेकर, १९३७ ) पृ. ६०–६१, १७७–१८०.

झाल्यावर हा संग्रह भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराकडे गेला व अजूनहि त्याच ठिकाणी आहे.[१२]

पेशवाई नष्ट झाल्यानंतर **इंग्रजांनीही** ग्रंथालये स्थापन करण्यात पुढाकार घेतलेला आढळतो. गव्हर्नर, कलेक्टर, मामलेदार, जड्ज, एज्युकेशनल इन्स्पेक्टर यांसारख्या सरकारी अधिकाऱ्यांनी ' नेटिव्ह जनरल लायब्ररया ' स्थापण्यात तसेच त्यांचा विकास साधण्यासाठी बरेच परिश्रम केलेले आढळतात. या संदर्भात कॅप्टन फ्रेंच, या व्यक्तींचा उल्लेख अवश्य करावयास हवा. त्या काळच्या ग्रंथालयातील कार्यकारी मंडळावर वा पदाधिकारी म्हणूनही इंग्रज अधिकाऱ्यांची निवड झालेली आढळते. या अधिकाऱ्यांनी ग्रंथालयांना सरकारी प्रकाशने, इतर वाचनसाहित्य वा थोडेफार आर्थिक साहाय्यहि मिळवून देण्याचा प्रयत्न केला. १८६७ चा प्रेस अँड रजिस्ट्रेशन ऑफ बुक्स अ‍ॅक्ट संमत करण्यामागे प्रयत्न इंग्रजांचेच होते. याशिवाय महत्त्वाचा व उल्लेखनीय प्रयत्न राज्यकर्त्यांनी केला तो म्हणजे हस्तलिखिते जमा करण्याचा. १८७५–९० च्या दरम्यान मुंबई प्रांतातील निरनिराळ्या ठिकाणी विखुरलेल्या जुन्या हस्तलिखितांचा संग्रह करण्यासाठी पीटरसन, मॅकडोनेल, भांडारकर, काथवटे प्रभृति पंडितांना पाठविले व सुमारे २० हजारपर्यंत हस्तलिखिते गोळा केली. कदाचित् काही वर्षांनी हे वाङ्मय नष्टहि झाले असते. परंतु त्यांनी ते वाचविले. ही हस्तलिखिते पुढे भांडारकर प्राच्य विद्या संशोधन मंदिर स्थापल्यानंतर मंदिराचे हवाली केलेली आढळतात.

श्रीमंत महाराज **सयाजीराव गायकवाड** हेहि ग्रंथप्रेमी राजाचे आदर्श उदाहरण आहे. अमेरिकेतील ग्रंथालयाची पाहणी केल्यावर आपल्याहि संस्थानांत ग्रंथालये स्थापन करावीत या इच्छेने बडोदे संस्थानात नमुनेदार ग्रंथालय संघटन त्यांनी उभे केले.[१३] ग्रंथालय क्षेत्रात जे जे नावीन्यपूर्ण उपक्रम भारतात सुरू झाले त्याचे उगमस्थान बडोदे संस्थान होय. आपल्या संस्थानातील ग्रंथालयांची उत्तम व्यवस्था पाहिली त्याचप्रमाणे बनारस विद्यापीठालाहि ग्रंथालयाची इमारत बांधून देऊन आपल्या ग्रंथालयप्रेमाचे चिरंजीव स्मारक उभे केले. बडोद्याच्या महाराजांप्रमाणेच महाराष्ट्रातील अनेक संस्थानिकांनी आपल्या संस्थानात नमुनेदार ग्रंथालये उभी केली. विद्येला आश्रय देऊन ग्रंथ-प्रसारास राजमान्यता तसेच साहाय्य केलेले आढळते. भोर, औंध, फलटण, मिरज, जमखंडी, इचलकरंजी, इत्यादि ठिकाणच्या संस्थानिकांनी स्थापन केलेली ग्रंथालये अजूनहि अस्तित्वात आहेत.



१२. व भि वेलसरे पेशव्यांची पुस्तकशाला ( साहित्य सहकार, मार्च १९६०, पृ ७–११ ).

13. N. M. Dutt. Baroda and its libraries ( Baroda, Cental library, 1928 ).

१९३५–३६ मध्ये भारतांत प्रांतिक विधिमंडळे अस्तित्वात आली व काँग्रेस सरकार अधिकारारूढ झाले. श्रीमान् **बाळासाहेब खेर**ांसारखे शिक्षणप्रेमी मुख्यमंत्री मुंबई प्रांताला लाभले. लोकशाही वाढवायची असेल तर खेड्यातील बहुजनसमाज साक्षर केला पाहिजे म्हणून त्यांनी प्रौढशिक्षण व साक्षरताप्रसार मोहीम सुरू केली. यामधूनच ग्रामग्रंथालये स्थापन करण्यांत येऊ लागली. १९३९ मध्ये प्रा. फैजी यांच्या अध्यक्षतेखाली 'पुस्तकालय विकास समिती' नेमून मुंबई प्रांतात ग्रंथालयांचे संघटन कसे असावे याचा अभ्यास होऊन निश्चित योजना तयार झाली. महायुद्धसमाप्तीनंतर या समितीच्या शिफारसींप्रमाणें मध्यवर्ती व प्रादेशिक तसेच जिल्हा, तालुका व इतर ग्रंथालये स्थापन केली. अशा तऱ्हेने ग्रंथालयांची दृढ पायावर उभारणी करण्याचा प्रयत्न केला. विदर्भातील केंद्रीय व जिल्हा ग्रंथालये सरकारनेच स्थापन केली व त्याद्वारा जनतेला विनामूल्य ग्रंथवाचनाची सोय करून दिली आहे. इतर सार्वजनिक ग्रंथालयांना अनुदान देऊन त्यांच्या उपजीविकेस शासन साहाय्य करीत आहे.

**स्थानिक स्वराज्य संस्था** हा सुद्धा राज्यकर्त्यांचाच एक भाग आहे. त्यांनी सुद्धा विविध ठिकाणी मोफत वाचनालये स्थापन केलेली आढळतात. पुणे, मुंबई या ठिकाणच्या महापालिकांनी आपल्या स्वतःच्या ग्रंथालय योजना सुरू केलेल्या आढळतात.

याशिवाय सरकारने विविध संस्था–शाळा, महाविद्यालयें, तांत्रिक शिक्षण संस्था, संशोधन संस्था स्थापन केल्या आहेत. तेथील ग्रंथालयांची स्थापना वा वाढ सरकारनेच केली आहे. सरकारी खात्यांमधून ग्रंथालयांची स्थापना झालेली आहे. लोकशाहीच्या युगातील राज्यकर्ते हेच होत. म्हणून हे प्रयत्न राज्यकर्त्यांचे मानावयास हवेत.

वरील सर्व माहितीचा आढावा घेतला तर असे लक्षात येईल की विविध प्रकारची ग्रंथालयें स्थापण्यासाठी व त्यांचा विकास करण्यासाठी राज्यकर्त्यांनी वा त्यांच्या प्रतिनिधींनी फारच परिश्रम केले आहेत. त्याचप्रमाणे जेथे राज्यकर्ते ग्रंथप्रेमी आहेत तेथे ग्रंथालयाचा विकास स्थिर पायावर व जलद गतीने होत आलेला आढळतो.

## सार्वजनिक कार्यकर्ते

राज्यकर्त्यांनी ग्रंथालय स्थापनेमध्ये व त्यांच्या वाढीमध्ये जितका भाग घेतला त्यापेक्षा जास्त कार्य सार्वजनिक कार्यकर्त्यांनी केलेले आढळते. महाराष्ट्रातील सुमारे १२०० ग्रंथालयापैकी २५ ते ३० टक्के ग्रंथालयांची मालकी वा संचालन शासना तर्फे होत आहे[१४] यावरून वरील विधानाची सत्यता लक्षात येईल. बाकीची ७०–७५ टक्के ग्रंथालये सार्वजनिक मालकीची आहेत. या सर्व ग्रंथालयाचे संस्थापक, वर्धक व सध्याचे चालक, पदाधिकारी या सर्वांची माहिती जमा करून प्रसिद्ध करणे हे आणखी एका सूचीचे काम होईल. म्हणूनच या सूचीमध्ये या सर्वांची माहिती देणे मला शक्य झाले नाही. वास्तव

१४. दा. ग. महाजन : महाराष्ट्रातील ग्रंथालयांची सूचि (मुंबई, १९६५).

ग्रंथालयचालकांचे प्रमुख वर्गाविषयी तसेच त्यांनी केलेल्या बहुविध कार्यातील विविध पैलूंचे दिग्दर्शन येथे करीत आहे.

विद्यापीठ, महाविद्यालये व शालेय ग्रंथालयांचे संस्थापक वा चालक हे त्या त्या संस्थांचे प्रमुख हेच असतात. ग्रंथालय हा विभाग संस्थेच्या अनेक विभागांपैकी एक विभाग मानला जातो व त्यासाठी आर्थिक व इतर तरतुदी संस्थेच्या एकूण अर्थसंकल्पात केल्या जातात. या रीतीने या संस्थांतील ग्रंथालयांची स्थापना झालेली आढळते. ग्रंथालयांचा विकास मात्र संस्थाप्रमुखांच्या ग्रंथालयप्रेमावर वा आवडीवर झालेला आढळतो. ग्रंथालय ही आवश्यक बाब समजून त्यावर खर्च करणारे ग्रंथालयप्रेमी संस्था-चालक हे या ग्रंथालयांचे संवर्धकच. त्यांच्या या उपक्रमांना सरकारी अनुदानहि नियमानुसार प्राप्त झालेले आढळते. स्वातंत्र्योत्तर कालामध्ये विद्यापीठ अनुदान मंडळ व राज्यसरकारे यानी लाखो रुपयांचे अनुदान देऊन या ग्रंथालयाचा विकास झाला आहे.

विशेष व संशोधनसंस्थांच्या ग्रंथालयाबाबत ही वरीलप्रमाणेच अनुमान काढण्यास हरकत नाही. सरकारी अनुदानाप्रमाणेच परकीय सरकारे वा संस्थांकडूनहि साहाय्य यापैकी काही संस्थांना मिळालेले आढळते. याला अपवाद काही खाजगी संशोधनसंस्था व उद्योगधंद्यांनी स्थापिलेली ग्रथालये व माहिती केंद्रे. या संस्थांच्या चालकांनी स्वखर्चाने ग्रंथालये उभी केली आहेत.

**सार्वजनिक** ग्रंथालयांची परिस्थिति मात्र फार वेगळी आहे. वाचनाची आवड आहे परंतु प्रत्येक ग्रंथ विकत घेऊन वाचता येत नाही. ही भूक भागविण्यासाठी अशा 'वाचकबुभुक्षु' मंडळींनी एकत्र येऊन सार्वजनिक ग्रंथालयें स्थापन केली. हे जनतेचे उत्स्फूर्त प्रयत्न होत. या प्रयत्नामध्ये स्वत्व, स्वाभिमान, स्वावलंबन व स्वयंपूर्णतेचा आविष्कार घडलेला आढळतो. यात सर्वसामान्य वाचक आहे. अभ्यासक आहे, संशोधक आहे, व्यवसाय म्हणून वाचन व अभ्यास करणारे अध्यापक, प्राध्यापक, विद्वान पंडित आहेत; साहित्यिक आहेत तसेच वृत्तपत्रकारहि आहेत. लोकशिक्षणप्रेमी समाज-सेवक तसेच राजकारणी लोकनेतेहि आहेत. समाजातील सर्व थरातील, सर्व जमातीतील सर्व व्यवसायातील लोकांनी ग्रंथालयाचा हा जगन्नाथाचा रथ ओढला आहे. अजूनहि ओढत आहेत.

या दृष्टिकोणातून लोकहितवादी अथवा गोपाळ हरि देशमुख हे महाराष्ट्रातील महत्त्वाचे असे ग्रंथालय कार्यकर्ते मानावयास हवेत. ते १८४८ मध्ये स्थापन झालेल्या पुणे नेटिव जनरल लायब्ररीचे प्रमुख संस्थापक व काही वर्षे चिटणीसही होते. त्यांनी आपल्या 'शतपत्रां'त या ग्रंथालयाच्या स्थापनेचा इतिहास दिला आहे.[१५] मुंबईच्या एशियाटिक सोसायटीचे सभासद प्रारंभीच्या काळात युरोपियनापुरते मर्यादित होते. १८४० त प्रथम माणेकजी करसेटजी या भारतीयाला सोसायटीचे सभासद होता आले.

१५. लोकहितवादीची शतपत्रे. पत्र ३ : 'पुण्यात लायब्ररीची स्थापना'.

नंतर भाऊ दाजी, जस्टिस तेलंग, डॉ. भांडारकर, वि. ना. मंडलिक, जगन्नाथ शंकरशेट इत्यादींनी सोसायटीला मानाचे स्थान मिळवून दिले. श्री. एन्. एम्. वाडिया हे १८४६ मध्ये मुंबईला स्थापन झालेल्या नेटिव जनरल लायब्ररीचे प्रमुख संस्थापक होत.

अशा तऱ्हेने महाराष्ट्रात नेटिव जनरल लायब्ऱ्या स्थापन होऊन काम करू लागल्या. अर्थात् ही सर्व वर्गणीग्रंथालये होती. पैसे देऊन वाचन करणे ही थोड्या व्यक्तींनाच शक्य गोष्ट होती. त्यामुळे वर्गणीदारांत युरोपियन्स, सरकारी अधिकारी व प्रतिष्ठित नागरिक यांचाच भरणा जास्त होता. त्यावेळच्या ग्रंथालयात इंग्रजी ग्रंथांचे प्रमाण जास्त होते व त्यामानाने मराठी ग्रंथाचे प्रमाण अल्प होते.

या परिस्थितीत बदल विशेषतः १८७०–८० नंतर होऊ लागला. मराठी वाङ्मयात ग्रंथनिर्मिती जास्त प्रमाणावर होऊ लागली. ज्योतिबा फुले व आगरकर यांच्या वाङ्मयाने सामाजिक आंदोलने निर्माण झाली. चिपळूणकरांच्या निबंधमालेने वैचारिक क्रांति होऊ लागली. लो. टिळकांचा केसरी गर्जू लागला. राष्ट्रीय स्वातंत्र्य मिळविण्याचे ध्येयाने इंडियन नॅशनल काँग्रेसची स्थापना झाली व अशा तऱ्हेने समाजात राजकीय, सामाजिक व धार्मिक जागृति होऊ लागली. स्वराज्याची चळवळ सुरू झाली. या लोकजागृतीचे प्रतिबिंब ग्रंथालयातहि पाहावयास मिळते.

यातूनच केवळ मराठी भाषिक ग्रंथसंग्रह करण्याची आवश्यकता अनेकांना वाटू लागली. न्या. मू. रानडे यांनी या कल्पनेचा पाठपुरावा केला. केसरीने 'देशभाषीय ग्रंथसग्रहाची आवश्यकता' या विषयावर १८८० साली पाच लेखांक लिहून या प्रश्नास वाचा फोडली. परत १८८३ साली 'नॅशनल मराठी लायब्ररी अथवा महाराष्ट्राचे पुस्तकालय' हा लेख लिहून चालना दिली. परंतु या कल्पनेला मूर्त स्वरूप दिले महाराष्ट्र सारस्वतकार वि. ल. भावे यांनी या २२ वर्षाच्या तरुणाने १ जून १८९३ रोजी ठाणे येथे केवळ मराठी ग्रंथाचाच संग्रह करावा या हेतूने **'मराठी ग्रंथसंग्रहालय'** स्थापन केले व एक वर्षातच त्यांनी त्यातील पुस्तकाची यादी तयार करून छापिली.

याच उद्देशाने १८९८ साली **पुणतांबेकर** प्रभृति उत्साही कार्यकर्त्यांच्या चिकाटीने मुंबईला **'मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय'** व पुणे येथे **पावगी** प्रभृति विद्याप्रेमी मंडळींनी १९११ मध्ये **'पुणे मराठी ग्रंथालय'** स्थापन केले. या ग्रंथालयांप्रमाणेच अनेक मराठी भाषी सार्वजनिक वाचनालये स्वदेशी नावाने स्वाभिमानींनी सुरू केली. १९१० ला इतिहासाचार्य राजवाडे यांनी भारत इतिहास संशोधक मंडळाची स्थापना करून महाराष्ट्राची इतिहासाची साधने जिवापाड कष्ट करून जमविण्यास सुरुवात केली. शंकर श्रीकृष्ण देव यांनी धुळ्यास सत्कार्योत्तेजक सभा काढून (१८९३) रामदासी वाङ्मयाचा संग्रह सुरू केला. मुंबई सरकारने महाराष्ट्राच्या विविध भागातून जमविलेले हस्तलिखित ग्रंथ भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिरात येऊन विराजमान झाले (१९१७). अशा तऱ्हेने मराठी भाषेची ग्रंथालये स्थापन होऊ लागली.

या कालखंडात ब्रिटिश सरकारच्या अमानुष दडपशाहीचा वरवंटा सगळीकडे फिरत होता. भारतात स्वातंत्र्याचे वारे संचारू लागले असले तरी उघडपणे व स्पष्टपणे स्वातंत्र्याचे विचार व्यक्त करणे, त्यासाठी एकत्र जमणेही कठीण होऊ लागले. म्हणूनच लोक ग्रंथालयाचा वापर एकत्र येण्यासाठी करू लागले. या व्यासपीठाचा उपयोग अनेक लोकनेत्यांनी केलेला आढळतो. वाचनालयाचे कार्यकर्तेहि लोकनेत्यांना ग्रंथालयाच्या वार्षी कार्यक्रमासाठी अध्यक्ष, प्रमुख पाहुणे या वक्ते म्हणून बोलावीत व ही एकत्र येण्याची संधि प्राप्त करून देत.

या राजद्रोही गोष्टी ग्रंथालयात होऊ नयेत म्हणून १९०९ साली सरकारने ग्रंथालये सरकारकडे नोंदविण्यासाठी एक नियमावलि तयार केली. त्यांत ग्रंथालयाची जागा राजकीय कारणासाठी वापरू नये, इतरही कोणत्या स्वरूपाची सार्वजनिक सभा वा व्याख्यान डी. पी. आय. च्या पूर्वपरवानगी विना करू नये, सरकारने निषिद्ध केलेले वाङ्मय ग्रंथालयात ठेवू नये ह्या त्या प्रमुख अटी. परंतु या अटी त्या काळच्या काही ग्रंथालय चालकांनी धुडकावून लावल्या व सरकारी मान्यतेची गरज नाही हे ठणकावून सांगितले. त्यामुळे सरकारकडे नोंदलेल्या ग्रंथालयांची संख्या १९०८–०९ मध्ये जी १२० होती ती १९०९–१० मध्ये ५१ वर गेलेली आढळते.[१६] लोकमान्य टिळक, न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे, दे. भ. न. चिं. केळकर, डॉ. भांडारकर प्रभृति लोकनेत्यांनी ग्रंथालयांच्या प्रश्नासंबंधी प्रकटपणे विचार प्रदर्शित केलेले आढळतात.

## १९२० ते १९४५

१९२० साली लो. टिळक स्वर्गवासी झाले. त्यानंतर लो. टिळकांची जी स्मारके महाराष्ट्रामध्ये उभारली गेली, त्यात ग्रंथालयाचे प्रमाण फार मोठे आहे.[१७] यावरून लो. टिळक आणि ग्रंथालये यामधील आपलेपणा लक्षात येतो. याच कालखंडात खालील महत्त्वाची महाराष्ट्राला भूषणभूत ठरणारी ग्रंथालये समाजसेवकानी व संशोधकांनी स्थापन केली.

नागपूर विद्यापीठ ( १९२३ ), विदर्भ साहित्य संघाचे गडकरी ग्रंथालय ( १९२३ ), कैवल्यधाम ग्रंथालय ( १९२४ ), प्राज्ञ पाठशाळा मंडळ ( १९२५ ). भोसला वेदशास्त्र महाविद्यालय, ( १९३० ), राजवाडे संशोधन मंडळ, धुळे ( १९३२ ), य. खु. देशपांडे यांचे शारदाश्रम, यवतमाळ ( १९३२ ), रामकृष्ण आश्रम ( १९३२ ), केसरी मराठा ग्रंथशाला ( १९३२ ), शंकर श्रीकृष्ण देवांचे

16. Bombay Govt : A Review of Education in Bombay State 1855–1955 ( Bombay, 1958 ), p. 506

१७. स. वि. बापट : लोकमान्य टिळक यांच्या आठवणी व आख्यायिका, खं. २. लोकमान्य टिळक यांची ठळक स्मारके ( पुणे, स. वि. बापट, १९२५ ). शेवटची ६ पृष्ठें.

श्रीसमर्थ वाग्देवता मंदिर ( १९३६ ) भारतीय विद्याभवन ( १९३९ ). या कालखंडात सार्वजनिक वाचनालयांप्रमाणेच शैक्षणिक व संशोधन ग्रंथालयांची स्थापना व वाढ होऊ लागली. प्रौढ शिक्षण व साक्षरता प्रसार योजनेमुळे ठिकठिकाणी ग्रामीण वाचनालये सुरु होऊ लागली.

स्वातंत्र्योत्तर कालखंडामध्ये ग्रंथालयांची स्थापना व विकास या दोनही बाबीत झपाट्याने प्रगती झालेली आढळते. सरकारी घोषणामुळे केंद्रीय, प्रादेशिक तसेच जिल्हा, तालुका व शहर वाचनालये कांहींशा स्थिर पायावर उभी राहू लागली. विदर्भात तर सरकारच्या मालकीची ग्रंथालययंत्रणा लोकांना मोफत ज्ञान देण्यासाठी सिद्ध झाली. मराठवाड्यामध्ये पश्चिम महाराष्ट्राचे अनुकरण करून ग्रंथालये स्थापण्यास सुरुवात केली आहे. वाचन ही लोकांची गरज बनल्याने धंदेवाईक तसेच मोफत पेटी वाचनालयेही सुरू झाली.

## सद्यःस्थिती

सार्वजनिक ग्रंथालये ही खरी म्हणजे वर्गणी ग्रंथालये आहेत. सर्व वर्गणीदार हे लोकशाही अर्थाने ग्रंथालयाचे मालक आहेत. प्रत्येक ग्रथालयाचा कारभार घटनेप्रमाणे चालतो. घटनेनुसार दर दोन वर्षांनी वा काही ठिकाणी तीन वर्षांनी निवडणूक होऊन कार्यकारी मंडळ व पदाधिकारी यांची निवड होते.

अध्यक्ष व उपाध्यक्ष या पदासाठी समाजातील वजनदार व प्रतिष्ठित व्यक्तींची निवड होत असते. याचे कारणच म्हणजे ग्रथालय या संस्थेला समाजामध्ये योग्य प्रतिष्ठा नाही. त्यामुळे या प्रतिष्ठित लोकाचे मदतीने ग्रंथालयांना आर्थिक साहाय्य मिळवून देणे व सस्थेचा कारभार व्यवस्थित रीतीने चालविण्याची खबरदारी घेतली जाते.

त्यानंतरचे पदाधिकारी म्हणजे कार्यवाह, सहकार्यवाह व खजिनदार हे होत. कार्यवाहाचे काम हे फार महत्त्वाचे आहे. सस्थेचा कारभार व व्यवस्था यावर अप्रत्यक्ष हुकमत बऱ्याच ठिकाणी कार्यवाहाचीच असते. त्याला हे काम करण्यास बराच वेळहि द्यावा लागतो. लोकशाहीच्या काळांत कार्यवाह हा केवळ प्रामाणिक असून भागत नाही. तो संघटनकुशल, सभाशास्त्रांत पारंगत, आर्थिक व्यवहाराची माहिती असलेला तसाच खंबीर मनाचाही लागतो.

विविध पोटसमित्यांचे द्वारा ग्रंथालयातील इतर कामकाज चालते. वर्गणीदारामधूनच या समित्यांवर निवड होते.

या सर्व प्रकारच्या कार्यकर्त्यांनी ग्रंथालयामध्ये अनेक उपक्रम सुरू करून ग्रंथालय हे समाजजीवनाशी एकरूप करण्याचा प्रयत्न केला आहे. वसत व्याख्यानमाला, बहिःशाल शिक्षण व्याख्यानमाला, शारदोत्सव लेखकनेत्यांचे सत्कार व भाषणे, मोठमोठ्या व्यक्तींच्या जयंत्या तसेच पुण्यतिथ्या, स्नेहसंमेलने, परिसंवाद, ग्रंथप्रदर्शने, विद्यार्थ्यांसाठी अभ्यासिका व पुस्तक पतपेढ्या, दिवाळी अंक योजना, परगोव मासिके वा फिरती

ग्रंथालये योजना, निबंधस्पर्धा, तैलचित्रे, नाट्यप्रयोग करण्यासाठी नाट्यमंदिरे, कविता वाचन या सारख्या विविध उपक्रमांनी ग्रंथालयांद्वारे लोकशिक्षण व मनोरंजन करण्याचा प्रयत्न केला आहे. म्हणूनच ग्रंथालयांना हल्ली 'सांस्कृतिक केंद्र' म्हणण्यात येऊ लागले आहे.

या सार्वजनिक कार्यकर्त्यांचे वैशिष्ट्य म्हणजे 'विनावेतन' काम. कामासाठी कोणत्याहि प्रकारे मोबदला मागितला जात नाही या दिलाहि जात नाही. कांहीं जण हौसेने काम करतात तर काही जण छंद म्हणून काम करतात. तर काहीजण निष्ठा म्हणून काम करतात. ही सामाजिक कार्य करण्याची, घरचे खाऊन लष्कराच्या भाकरी भाजण्याची या स्वकल्याणात आनंद न मानता समाजकल्याणात आनंद मानण्याची वृत्ति परंपरेने महाराष्ट्रांत जोपासली गेली आहे.

निवडणुकीने पदाधिकारी निवडण्याच्या पद्धतीमुळे सातत्याने एखाद्या ग्रंथालयाचे काम करणाऱ्या व्यक्ती फारच थोड्या आढळतात. कांहीं ठिकाणी गटबाजीचा चंचुप्रवेश होत आहे तर काहीं ठिकाणी निवडणुकीला राजकीय रंगहि देण्यांत येत आहे. त्यामुळे कांहीं गटांची या व्यक्तींची ग्रंथालयांत मक्तेदारी या मिरासदारी बनूं लागली आहे. आणि म्हणूनच अनेक होतकरू प्रामाणिक प्रतिष्ठित कार्यकर्ते डावलले जातात किंवा काही काल कामाचा अनुभव घेऊन सार्वजनिक कार्याची हौस फेडून 'तेथे पाहिजे जातीचे' असा शेरा मारून बाजूला होतात. त्यामुळे पदाधिकाऱ्यांत वारंवार बदल होत असतो. अशा बदलणाऱ्या कार्यकर्त्यांचा ग्रंथालयविषयक दृष्टिकोण काही अंशी अपरिपक्व असतो. त्याचा परिणाम ग्रंथालयाच्या कामकाजावर वा कारभारावर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे होत असतो.

असे असले तरी मुंबईचे वा वि. भट, वि. गो. फाटक, स. का. पाटील, डॉ. ओक, श्री. व्यास, के. देवदे, पुण्याचे श्रीगोंदेकर, पाटणकर, साळवी, गोखले, पवार, बोडस, गाडगीळ, नाशिकचे औरंगाबादकर, साताराचे आचार्य, चाफेकर पंढरपूरचे उत्पात, अलिबागचे पंडित, रहाळकर, तळेगांवचे हरिभाऊ देशपांडे, जळगांवचे दे. वि कुलकर्णी, मुरलीधर गंधे, गारगोटीचे अन्तूरकर, खेडचे आपटे, नगरचे नानल व गोरे, यावलचे नाईक, वेंगुर्लेचे वि. म. नाईक, ऐतवडे खुर्द येथील बाजीराव पाटील, पालीचे कै. कुटे, उरुण-इस्लामपूरचे फल्ले, धामणीचे बेरी, पारनेरचे बाबळे, मराठवाड्यातील जिंतूरकर, महाराज, नागपूरचे उपाध्ये, जैन, देशाडराय, पाठक, लिमये, अकोल्याचे पोतदार, खामगावचे डिडवाणी, सेवक, आर्वीचे देशमुख, डॉ. वानखेडे, पाडिया, वर्ध्याचे मोहरीर प्रभृति कार्यकर्त्यांनी आपापल्या ग्रंथालयाचा विकास घडवून आणण्यासाठी सातत्याने परिश्रम घेतले असल्याचे लक्षात येते.

**देणगीदार**—आणखी एका महत्त्वाच्या कार्यकर्त्यांचा निक्षून उल्लेख केला पाहिजे ते म्हणजे देणगीदार. ग्रंथालयांचे आर्थिक प्रश्न हे जीवनमरणाचे प्रश्न होत. ग्रंथालय ही वर्धिष्णु संस्था आहे. ग्रंथ, मासिके, वृत्तपत्रे यासारखे वाचनसाहित्य ग्रंथा-

ल्यात वाढत जाते. त्यासाठी कपाटे, खुर्च्या, टेबले यासारखे फर्निचर लागते. वाचकांच्या संख्यावाढीबरोबर ग्रंथालयसेवक व वाचनसाहित्यांत वाढ करावी लागते. या वाढत्या व्यापासाठी ग्रंथालयांना स्वतंत्र व प्रशस्त इमारती आवश्यक असतात. अर्थात वाचकांच्या वर्गणीमधून ही भांडवली व कायम स्वरूपाची कामे होऊ शकत नाहीत. परंतु विकसनशील समृद्ध ग्रंथालयांसाठी या गोष्टींची नितांत आवश्यकता असते. हा प्रश्न अनेक धनिकांच्या, देणगीदारांच्या उदार आश्रयाने बऱ्याच ठिकाणी सोडविलेला आढळतो.

ग्रंथालयाच्या इमारतीसाठी सार्वजनिक कार्यकर्त्यांनी समित्या स्थापून, निधि जमवून, सरकारकडून, स्थानिक स्वराज्य संस्थांकडून तसेच अनेक लहानसहान देणगीदारांकडून जागा मिळविल्या. जागा मिळाल्यानंतर त्यावर परत विविध प्रकारे निधि जमवून इमारती उभ्या केल्या. इमारती बरोबरच ग्रंथ ठेवण्यासाठी कपाटे व वाचनासाठी टेबले, खुर्च्या आदि फर्निचरही आणले. तसेच ग्रंथसंग्रह समृद्ध केला. ग्रंथालयाचा चरितार्थ निर्वेध रीतीने व्हावा म्हणून कायम उत्पन्नाची साधने निर्माण केली वा कांही उपक्रम करून संस्थेस कर्जमुक्त केले. महाराष्ट्रातील ग्रंथालयांनी एकूण जिंदगीची बेरीज कोणी केली तर तिची किंमत कोट्यवधि रुपयांनी होईल. हे एवढे प्रचंड आर्थिक साहाय्य देणाऱ्या मोठमोठ्या हजारो धनिकांचे वा लहानसहान लक्षावधि देणगीदाराचे ऋण फार मोठे आहे.

प्रारंभीच्या काळात इंग्रजी अधिकाऱ्यांनी देणग्या दिलेल्या आढळतात. त्याचप्रमाणे ग्रंथालयांशी संबंधित व्यक्तींनी अनंत हस्ते ग्रंथालयांना देणगी दिलेल्या आहेत- या धनिकांच्या देणगीचे त्या काळी फार मोल होते म्हणून देणगीप्रीत्यर्थ ग्रंथालयांना देणगीदाराची नावे दिलेली आढळतात. मुंबईचे डेव्हिड ससून, पेटिट, सुलड्याला ट्रस्ट, पुण्याचे फर्ग्युसन कॉलेजला देणगी देणारे वाडिया, सोलापूरचे हिराचंद नेमचंद, खामगांवचे दस्तुर रतनजी, नागपूरचे राजाराम सीताराम दीक्षित, अकोल्याचे बाबूराव देशमुख, जळगांवचे वल्लभ वालजी, धुळ्याचे धोंडो शामराव गरुड, येवल्याचे भाटे, चाळीसगावचे शेट नारायण बंकट, मालेगावचे काकाणीशेट, दापोलीचे हरि केशव गोखले, मिरजचे पटवर्धन, बुलढाण्याचे गर्दे हे व यासारख्या असंख्य देणगीदारांच्या आश्रयाने ग्रंथालये उभी झाली. काहींच्या स्मरणार्थ ग्रंथालयांना वा त्यातील दालनाला देणगीदारांची नावे दिलेली आढळतात.

इमारतीबरोबरच कपाटे, टेबले, खुर्च्या, घड्याळे, तैलचित्रे, पुतळे यासारख्या कायम स्वरूपाच्या वस्तू ग्रंथालयांना अनेक देणगीदारांनी दिलेल्या आढळतात.

**ग्रंथांच्या देणग्या**–ग्रंथ व इतर वाचनसाहित्य ग्रंथालयास देणारे देणगीदार अनेक ग्रंथालयाचा ग्रंथसंग्रह समृद्ध करण्यास कारणीभूत झाले आहेत. प्रेस अँड रजिस्ट्रेशन ऑफ बुक्स ॲक्टान्वये सरकारास मोफत प्रती पाठविणारे सर्व मुद्रक व प्रकाशक हे देणगीदारच. यांच्याच आश्रयाने केंद्रीय व प्रादेशिक ग्रंथालये सुस्थापित झाली. याशिवाय अनेक व्यक्तींनी, जुन्या मातबर घराण्यांनी आपल्या घरातील कष्टाने जमविलेला ग्रंथसंग्रह या ऐतिहासिक कागदपत्रे, हस्तलिखिते, आयुष्याच्या शेवटी वा त्यांचे वारसांनी विविध

ग्रंथालयांना भेट म्हणून दिले आहेत. या रीतीने मोठमोठाली ग्रंथालये या निवडक ग्रंथसंग्रहामुळे समृद्ध झाली आहेत. डॉ. जयकर, डॉ. भांडारकर, माडगांवकर, भोर, इचलकरंजी, बडोदा, औंध वगैरे संस्थानचे राजेसाहेब, डॉ. आंबेडकर, लो. टिळक, किर्लोस्करवाले, मंडलीक, रँ. परांजपे, शंकर गणेश दाते, प्रा. फाटक वगैरेंसारख्या विद्वानांचे ग्रंथसंग्रह हे राष्ट्रीय ठेवे होत.

## (३) ग्रंथालय चळवळीमधील कार्यकर्ते

'सामर्थ्य आहे चळवळीचे' या समर्थोक्तिचा प्रत्यय सध्याच्या लोकजीवनात पदोपदी जाणवतो. त्याला ग्रंथालय क्षेत्र अपवाद कसे राहणार? आणि चळवळ म्हटल्यावर संघटना उभी करणे आवश्यक ठरते. ग्रंथालयाशी संबंधित सर्व व्यक्तींना व संस्थाना एकत्र आणून ग्रंथालयांच्या अडचणींचे निराकरण करणे ही संघटनेमागील प्रमुख भूमिका. त्यासाठी ग्रंथालय परिषदा भरविण्यात आल्या. त्यांतून ग्रंथालय संघ स्थापन झाले. त्यांनी आपल्या उद्दिष्टांची व्याप्ति कालमानानुसार थोडी वाढवली. ग्रंथपालनाचे शिक्षण, ग्रंथालयशास्त्र संशोधन, ग्रंथपालन वाङ्मय प्रकाशन तसेच ग्रंथालय सेवकाच्या प्रशिक्षणाचा व वेतनश्रेणीचा अंतर्भाव करण्यांत आला. ग्रंथांचा प्रसार व वाचनाची आवड निर्माण करणे हेही पुरोगामी हेतू घेऊन ग्रंथालय संघ संघटितरीत्या काम करू लागले.

वरील अर्थाने महाराष्ट्रातील ग्रंथालय चळवळीची सुरुवात १९२१ साली झाली असे म्हणावे लागेल. १९२१ साली बॅ. जयकर यांचे अध्यक्षतेखाली पहिली महाराष्ट्रीय मोफत वाचनालय परिषद पुणे येथे भरली. या उपक्रमामागे कळकळीचे प्रयत्न होते ते **श्री. दत्तोपंत जोशी** यांचेच. त्यांनीच १९२१, १९२६ व १९३९ च्या ग्रंथालय परिषदा भरविण्यात पुढाकार घेतला. 'त्यांनीच महाराष्ट्र वाचनालय संघ' स्थापन केला. व त्याद्वारे महाराष्ट्रातील वाचनालयांची नोंदणी करणे, त्यांना वृत्तपत्रे, मासिके यांच्या वर्गणीत सवलती मिळवून देणें, स्थानिक स्वराज्य संस्थांना ग्रंथालयें स्थापन करण्यास सांगणें, रा. ब. बोले यांचेमार्फत ग्रंथालय कायद्याचे बिल मुंबई कायदेकौन्सिलात मांडणें दप्तरखान्यातील पुस्तकांची नीट व्यवस्था लावणें, प्रौढशिक्षण व साक्षरता प्रसाराचे कार्य ग्रंथालयांमार्फत सुरू करणे हे व यासारखे सर्व उपक्रम सुरू केले. ग्रंथालयांची माहिती जमा केली. पुण्याहून मुंबईस स्थलांतर झाल्यानंतर मुंबईमधील ग्रंथालय चळवळीत–मुंबई ग्रंथालय संघ स्थापनेत, बॉम्बे लायब्ररी स्टाफ युनियनची संघटना करण्यात तसेच अखिल भारतीय ग्रंथालय संघातही काम केले. कोठल्याही संस्थेचे वा संघटनेचे पाठबळ नसतांना एकाकीपणे परंतु चिकाटीने दत्तोपंतांनी जे प्रयत्न केले तेवढे प्रयत्न त्यांच्यानंतरच्या कार्यकर्त्यांनी केलेले नाहीत असे म्हटल्यास वावगे होणार नाही. ग्रंथालय चळवळीची व्याप्ती त्यांनी जी वाढवली तेवढी इतर व्यक्तीच्या कार्यक्रमामध्ये आढळून येत नाही. ग्रंथालय चळवळीतील १९२१–१९४२ हा दत्तोपंत जोशी कालखंड मानण्यास हरकत नाही.

या कालामध्ये बॅ. जयकर, दे. म. तात्यासाहेब केळकर, सरदार मुजुमदार, रा. ब. सी. के. बोले, ना. केशवराव कोरटकर, प्रा. चिं. वि. जोशी, हरिभाऊ देशपांडे प्रभृतींनी ग्रंथालय संघ, परिषदा व त्यातर्फे होणाऱ्या कार्यात भाग घेतला.

१९४० मध्ये फैजी समितीचा अहवाल प्रसिद्ध झाला. त्यामध्ये ग्रंथालय चळवळ वृद्धिंगत होण्यासाठी ग्रंथालय संघांची आवश्यकता प्रतिपादन करून ग्रंथालय संघांना आर्थिक साहाय्य देण्याबद्दल शिफारसही केली आहे. याच अनुरोधाने १९४२ ते १९४९ दरम्यानच्या काळात ग्रंथालय संघटनेचे स्फुट प्रयत्न झाले. १९४२ मध्ये डॉ. पु. म. जोशी, स. ल. कापडी, द. वा. जोशी, हिं. का. व्यास प्रभृतींनी 'मुंबई ग्रंथालय संघ' स्थापन केला. १९४५ त पुणे येथे वा. पु. कोल्हटकर, कृ. शं. हिंगवे, ज. बा. बुधकर, र. श. पारखी, प्रभृतींनी 'पुणे ग्रंथालय संघ' स्थापन करून मराठी माध्यमाचा ग्रंथपालन वर्ग सुरू केला. १९४५ त ठाणे येथे ग्रंथालय परिषद भरून '*मराठी ग्रंथालय संघ' स्थापन झाला व त्याचेतर्फे एक ग्रंथालय परिषदही भरली. त्यात* वा. वि. भट, प. त्रिं. सहस्रबुद्धे, चिंतामणी आपटे, सिधये प्रभृतींनी पुढाकार घेतला होता. 'कुलाबा जिल्हा वाचनालय संघ' कृ. के. रहाळकर, ग. भा. पंडित, वि. गो. फाटक प्रभृतींनी स्थापन करून कुलाबा जिल्ह्यांत ग्रंथालयांचा प्रसार करण्यास सुरुवात केली. ना. बाळासाहेब खेर, प्रा. धनंजयराव गाडगीळ, काकासाहेब कालेलकर, त्र्यं. दि. वाकनीस, र. प. कर्वे, प्रा. प्रियोळकर, शंकर गणेश दाते, डॉ. पु. म. जोशी, प्रभृति मान्यवर व्यक्तींनी या कार्यात सहभागी होऊन मार्गदर्शन केले. विदर्भातील नागपूरला ग्रंथालय परिषद करून त्यात सी. पी. अँड बेरार लायब्ररी असोसिएशन स्थापन झाली.

१९४९ मध्ये पुण्यास पहिली महाराष्ट्र ग्रंथालय परिषद भरली व त्यांत 'महाराष्ट्र ग्रंथालय संघ' स्थापन झाला. या संघातर्फे नियमितपणे जिल्ह्याच्या ठिकाणी ग्रंथालय परिषदा भरविण्यांत आल्या. 'साहित्य सहकार' हे मासिक व ग्रंथपालन वर्ग हे दोन महत्त्वाचे उपक्रम सुरू झाले. १९५१ मध्ये मुंबई ग्रंथालय संघानेही ग्रंथपालन वर्ग सुरू केला. १९५८ साली 'विदर्भ ग्रंथालय संघा' चे पुनरुज्जीवन होऊन तो जोमाने काम करू लागला. १९५९ मध्ये 'मराठवाडा ग्रंथालय संघ' स्थापन झाला व त्यानंतर मराठी भाषिकांचे महाराष्ट्र राज्य स्थापन झाल्यानंतर १९६३ त 'महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघ' स्थापन झाला. या संघातर्फे राज्य ग्रंथालय परिषदा भरविण्यात येऊ लागल्या. अशा तऱ्हेने महाराष्ट्रातील सर्व विभागात ग्रंथालय संघ स्थापन होऊन ते *काम करू लागले व त्यांच्या कार्यात एकसूत्रीपणा आणण्याचे प्रयत्न सुरू झाले.*

या प्रयत्नांत सार्वजनिक कार्यकर्त्यांप्रमाणेच ग्रंथपाल व ग्रंथालयसेवक यांनीही भाग घेतलेला आहे. ग्रंथपालन वर्गाचे सचालन व अध्यापन, ग्रंथालयशास्त्रावर पुस्तके लिहिण्याचे, ग्रंथालयाच्या विविध प्रश्नावर लेखन करण्याचे काम यांनी केले आहे. याशिवाय ग्रंथालय संघ स्थापनेत व त्याच्या विविध कार्यात त्यांनी भाग घेतला आहे. ग्रंथालय परिषदांत निबंध वाचन करून वा चर्चा परिसंवादांत अभ्यासपूर्ण भाग घेऊन

ग्रंथालय संघांच्या कार्याबाबतही फारशी वेगळी स्थिती दिसत नाही. ग्रंथपाल व सार्वजनिक कार्यकर्ते ग्रंथालय संघ चालवितात. ग्रंथपालन वर्गाचे काम ग्रंथपाल बघतात. ग्रंथालयशास्त्र व ग्रंथालय चळवळ यावर दोघेहि लिहितात व बोलतात. परंतु ग्रंथालय संघ भक्कम पायावर उभे करण्यासाठी वा ग्रंथालय चळवळ प्रगत करण्यासाठी धडाडीने, नेटाने व योजनाबद्ध कार्य होत नाही असे नाइलाजाने म्हणावे लागते. कारण या सर्वांची शक्ति आपले ग्रंथालय 'सांभाळण्यासाठी' वा 'चालविण्यासाठी' खर्ची पडत असते. प्रत्येकाचे प्रेम आपल्या ग्रंथालयावर जास्त दिसते. थोडीबहुत उरलेली शक्ति तो ग्रंथालय संघाच्या कामासाठी खर्च करतो. या कार्यात कोठल्याहि प्रकारचा 'लाभ' होत नसल्यामुळे किंवा प्रतिष्ठा प्राप्त होत नसल्यामुळे ग्रंथालय चळवळीबाबत निष्ठा बाळगणाऱ्या काही थोड्या व्यक्तीच सातत्याने व चिकाटीने कार्य करताना आढळतात. महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघ स्थापन होऊनही राज्यातील ग्रंथालय संघाच्या कार्यात सूत्रबद्धता व योजनाबद्ध कार्यक्रम यांचा अभावच दिसतो. भारतातील ग्रंथालय चळवळीशीहि महाराष्ट्रातील ग्रंथालय चळवळीचा काही संबंध राहिलेला दिसत नाही.

ग्रंथपालांनीही ग्रंथपालन व्यवसायास प्रतिष्ठा प्राप्त करून देण्यासाठी ग्रंथपालन हा पोटार्थी म्हणून व्यवसाय न करता ती जीवननिष्ठा मानली पाहिजे. स्वतःची पात्रता वाढविणे, आपले ग्रंथालय व्यवस्थित लावून वाचकांना विविध सेवा प्राप्त करून देणे याबरोबरच व्यावसायिक गोष्टीहि केल्या पाहिजेत. बडोद्याच्या मॅट्रिकपर्यंत शिक्षण घेतलेल्या कै. दंडवते यांनी संशोधनासाठी उपयुक्त असे विविध साहित्य जसे निर्माण केले तसा प्रकारचे साहित्य सध्याच्या विद्याविभूषित व सुस्थिर ग्रंथपालांना निर्माण करणे अशक्य आहे का? अभ्यासासाठी वा संशोधनासाठी उपयुक्त साहित्य निर्माण केल्याने ग्रंथपालांची प्रतिष्ठा वाढणार आहे असे मला ठामपणे वाटते. परंतु त्यासाठी सातत्याने परिश्रम केले पाहिजेत.

ग्रंथालयांच्या अभिवृद्धीवर ज्यांची समृद्धी अवलंबून आहे असे ग्रंथकार, साहित्यिक ग्रंथविक्रेते, प्रकाशक, वृत्तपत्रकार व नियतकालिकांचे संपादक या चळवळीशी संपर्क नाममात्रच ठेवतात असे दिसते. ग्रंथालयाशी ज्यांचा दैनंदिन संबंध आहे असे वाचक, अभ्यासक, अध्यापक, प्राध्यापक, संशोधक, विद्वान, पंडित वा शिक्षण व संशोधन संस्था चालकही ग्रंथालय चळवळीबाबत उदासीनच दिसतात. मग राजकारणी व लोकनेत्यांचा प्रश्नच वेगळा. या सर्वांना ग्रंथालय चळवळीचे महत्त्व पटवून देऊन प्रगतीसाठी एकत्र आणणे आवश्यक आहे.

हे कार्य घडवून आणण्यासाठी ग्रंथालय चळवळीला आणि केवळ ग्रंथालय चळवळीलाच जीवन वाहून घेणारे, दूरदृष्टीचे, सर्वसंग्राहक तसेच सर्वमान्य, प्रभावी तसेच लढाऊ, कळकळीचे नेतृत्व हवे. प्रभावी नेतृत्वाची उणीव महाराष्ट्रातील ग्रंथालय चळवळीत प्रकर्षाने जाणवते.

## विभाग १ ला

# पश्चिम महाराष्ट्र

## (अ) पुणे शहर

अभ्यंकर, विष्णू हरी (१७–८–१९११). ग्रं. प्र.; ग्रं. सा., टिळक कॉलेज ऑफ एज्युकेशन, १९३७→पत्ता– १०२७ (नवा) सदाशिव, पुणे २.

अरकडी, उद्धव रामदास (२५–८–१९२७). ग्रं. प्र.; ग्रं. सा., नौरोसजी वाडिया कॉलेज, १९४९→पत्ता– ९४।१७ प्रभात पथ, माई लेले बंगला, पुणे ४.

आठवले, सौ. सुशीला पांडुरंग. एम्. ए.; कार्यवाह, पुणे मराठी ग्रंथालय, १९६५→ पत्ता– 'वर्षा', १०९ सदाशिव, पुणे ९.

आपटे, चिंतामणी विष्णू (२५–१२–१९१५). एम्. ए.; व्यवसाय– प्रथम-श्रेणी अधिकारी, आयुर्विद्या महामंडळ, पुणे विभाग कचेरी, पुणे. कार्य– मुंबई व उपनगर ग्रंथालय परिषद व मराठी ग्रंथालय संघ या संस्थांचे सुरुवातीपासून कार्यकारिणीचे व क्रियाशील सभासद. संस्थापक सदस्य, चिटणीस (१९५०) व कोषाध्यक्ष (१९५१–५५), महाराष्ट्र ग्रंथालय संघ. पत्ता– ४०५।९ नारायण पेठ, हरिहर निकेतन, राजगुरु प्रेसजवळ, पुणे २.

आफळे, रामचंद्र चिंतामण (७–४–१९३१). ग्रं. सा., नौरोसजी वाडिया कॉलेज, १९६०→प्रका– गमतीदार गोष्टी ३ भाग. इचरनें, नचिकेत स्फुट लेखन. पत्ता– ११६७ कसबा पेठ, केदारी वाडा, पुणे ११.

आंबेकर, दत्तात्रय वासुदेव (१८८९). आजीव सदस्य, हिंद सेवक संघ. ग्रंथपाल, हिंद सेवक संघ ग्रंथालय, १९५७–६४.

आन्द्राड, जेम्स डॅनियल (१०–१२–१९४०). ग्रं. प्र.; ग्रं. सा., डेक्कन कॉलेज, १९६१→पत्ता–१३७२ शुक्रवार पेठ, पुणे २.

**उजळंबकर, कृष्ण मुकुंद** ( १५–१२–१९२७ ). एम्. ए., एल्एल्. बी., एम्. लिब्. एस्सी. ( दिल्ली ).; सूचिकार, उस्मानिया विद्यापीठ ग्रंथालय, हैद्राबाद, १९४४–५६; ग्रंथपाल, केंद्रीय सचिवालय ग्रंथालय, हैद्राबाद, १९५६; ग्रंथपाल, सचिवालय केंद्रीय ग्रंथालय, मुंबई, १९५६–५७; ग्रंथपाल, शासकीय केंद्रीय ग्रंथालय, नागपूर व सहाय्यक ग्रंथालय अभिरक्षक, विदर्भ विभाग, १९५७–६२; सहाय्यक ग्रंथालय अभिरक्षक, महाराष्ट्र विभाग, पुणे, १९६२→

कार्य—आजीव सदस्य, आंध्र ग्रं. संघ; 'संस्थापक व मंत्री, हैदराबाद ग्रं. संघ, १९५१–१९५६; आयोजक, अखिल भारतीय ग्रं. परिषद, १० वे अधिवेशन, हैद्राबाद, १९५३; उपाध्यक्ष, अखिल भारतीय ग्रं. संघ, १९५५; सदस्य, हैद्राबाद पब्लिक लायब्ररी बिल ड्राफ्ट कमिटी; शासकीय सदस्य, गव्ह. लायब्ररी कौन्सिल, हैद्राबाद; माजी उपाध्यक्ष, विदर्भ ग्रंथालय संघ; कार्यवाह, पद्मश्री रंगनाथन् सत्कार समिती, १९६२–६७

प्रका—( १ ) ग्रंथालय वर्गीकरण ( २ ) पंचसिद्धांत ( ३ ) सूचिकरण ( ४ ) पद्मश्री डि. रा. रंगनाथन् : व्यक्ती व कार्य ( ५ ) 'ग्रंथालय शास्त्राची पाच सूत्रे ( ६ ) ग्रंथालय शास्त्राची रूपरेषा ( ७ ) ग्रंथालय विधान ( ८ ) शालेय ग्रंथालय, तीन भाग ( ९ ) महाविद्यालयीन ग्रंथालये, भाग एक ( १० ) ग्रंथालय संघटन, तीन भाग ( ११ ) महाराष्ट्र राज्य ग्रंथालय मार्गदर्शिका ( १२ ) ग्रंथालय कायद्याचे स्वरूप ( १३ ) ड्राफ्ट पब्लिक लायब्ररीज बिल फॉर महाराष्ट्र ( १४ ) संपा. सिम्पोझियम ऑन लायब्ररी सायन्स : हैद्राबाद ग्रंथालय संघ ( १५ ) संपादक, ग्रंथालय : हैद्राबाद ग्रंथालय संघाचे मुखपत्र १९५५–५६. ( १६ ) अनेक लेख ( १७ ) याशिवाय अनेक कादंबऱ्या, कथासंग्रह, नाटके प्रसिद्ध. पत्ता–४६ वैदिकाश्रम, पुणे ४.

**उदगीकर, कु. नलिनी मनोहर** ( १९३५ ). बी. एस् सी., डिप्. लिब् (पुणे).; ग्रं. सा., गोखले इन्स्टिट्यूट, १९६१→पत्ता– ११२।४ एरंडवणा, पितृस्मृती, पुणे ४.

**उमराणीकर, हनुमंत बाळकृष्ण** ( २३–८–१९३० ). बी. एस्.सी., एम्. ए., डिप्. लिब् ( मुंबई ).; ग्रंथपाल, भा. इ. सं. मंडळ, १९५१–५२; डे. जि. मावेस्कूल, १९५६–५७; गव्हर्नमेंट पॉलिटेक्निक, १९५७–५८; वरिष्ठ साहाय्यक, जयकर ग्रंथालय, पुणे विद्यापीठ, १९५८–६२; ग्रंथपाल, विश्वकोश कार्यालय, वाई, १९६२–६४; टेक्निकल असिस्टंट, सेंटर ऑफ ॲडव्हॉन्सड स्टडी इन् संस्कृत, पुणे विद्यापीठ, १९६४→अध्यापक, ग्रं. वर्ग, म. ग्र. संघ. स्कुट लेक्चर; पत्ता– ६०१ पुलाची वाडी, नाटेकर बंगला, पुणे ४.

**कंटक, सौ. शेमा.** बी. ए., डिप्. लिब्.; ग्रं. सा., गोखले इन्स्टिट्यूट, १९६५→ पत्ता– ई।७५ एन्. सी. एल. कॉलनी, पाषाण, पुणे ८.

**करकरे, बाळकृष्ण दत्तात्रय** ( ३०–१२–१९२४ ). ग्रं. प्र.; ग्रं. सा., केसरी मराठा ग्रंथशाला, १९५४→व्यवस्थापक, ग्रं. वर्ग, म. ग्रं. संघ, तीन वर्षे. कार्यालयाची व्यवस्था कांहीं वर्षे पाहिली. पत्ता– लक्ष्मीनगर चाळ क्र. ४, खो. ३०, पर्वती रमणा, पुणे ९.

**काळे, दिनकर विनायक** ( ३०–१०–१८९८ ). एम्. ए. ( प्रथम श्रेणी, १९२८ ).; विद्यार्थी दशेत रत्नागिरी हायस्कूल ग्रंथालयाचे काम, त्यानंतर मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयात स्वयंसेवक म्हणून काम. सहसंपादक, 'केसरी'; संपादक 'सह्याद्रि' मासिक, १९३६–५७; क्यूरेटर, केसरी मराठा ग्रंथशाला, १९३२–५७; कार्यवाह, भारत इ. स. मंडळ, १९५७–६५; सध्या श्री. शं. ग. दाते सूचिमंडळात संपादक म्हणून काम करीत आहेत.

कार्य–स्वागताध्यक्ष, महाराष्ट्र ग्रंथालय परिषद, पुणे, १९४९; संस्थापक सदस्य, महाराष्ट्र ग्रंथालय संघ व त्यामध्ये चिटणीस ( १९४९–५० ), कार्याध्यक्ष ( १९५१–५४ ) उपाध्यक्ष, ग्रं. वर्ग अध्यापक, संघाच्या समित्यांचे सभासद म्हणून विविध कार्य; अध्यक्ष, कुलाबा जिल्हा ग्रंथालय परिषद, पनवेल, १९५६; चिटणीस महाराष्ट्र प्रादेशिक ग्रंथालय समिती, पुणे ( १९४७–५४ ); माजी सभासद, महाराष्ट्र रीजनल ॲड्व्हायसरी बोर्ड. प्रका–ग्रंथालय संघ, ग्रंथालय चळवळ याविषयी *'सह्याद्रि', साहित्य सहकार व इतर नियतकालिकांमध्ये व ग्रंथामध्ये* सातत्याने लेखन. पत्ता–११८६ सदाशिव, शेडगेवाडी, पुणे २.

**कुंदर, सुंदर मिजिरा** ( १३–७–१९४३ ). ग्रं. सा, ब्रिटिश कौन्सिल ग्रंथालय, १९६३→

**कुलकर्णी, नारायण अनंत** ( ११–११–१९३१ ). बी. ए. ( स्पेशल ) डिप्. लिब्. ( पुणे ); तृतीय श्रेणी ग्रंथपाल, कॉलेज ऑफ मिलिटरी इंजिनियरिंग, १९६२→पत्ता–६६८ कसबा, नारायण निवास, पुणे ११.

**कुलकर्णी, प्रभाकर नरहर** ( १६–१०–१९३३ ). ग्रं. प्र. ( प्रथम क्रमांक ); ग्रं. सा., जयकर ग्रंथालय, पुणे विद्यापीठ, १९५४→पत्ता–१७८ पर्वती, पुणे ९.

**कुलकर्णी, प्रल्हाद दिगंबर** ( २३–९–१९२१ ), बी. ए. ( १९५२ ) डि. कॉम्. ( १९४१ ), डिप्. लिब ( मुंबई, १९५४ ); ग्रंथपाल, बृ. म. व्यापारी महाविद्यालय, १९४३→अध्यापक, ग्रं. वर्ग, महाराष्ट्र ग्रं. सं. ( १९६० ६५ ).स्फुट लेखन. पत्ता–१० ब, सदाशिव, टिळक रस्ता, गोखले इमारत, म. सा. परिषदेसमोर, पुणे ९.

**कुलकर्णी, मोरेश्वर पिलाजी** ( १६–९–१९२९ ). ग्रं. प्र; रेकॉर्ड कीपर,

नॅशनल केमिकल लॅबोरटरी ग्रंथालय, ११ वर्षे. पत्ता–एच. ५४, एन्. सी. एल. कॉलनी, पुणे ८.

**कुलकर्णी, मोहन कृष्णाजी** ( ७–८–१९३८ ). बी. ए., ग्रं. प्र.; ग्रं. सा., डेक्कन कॉलेज, १९५९→पत्ता : खोली, नं. २९, डेक्कन कॉलेज वसती गृह पुणे ६.

**कुलकर्णी, शंकर केशव** ( १–८–१९१२ ). ग्रं. प्र.; ग्रं. लेखनिक, स. प. महाविद्यालय, १९५३→पत्ता : ९०४ सदाशिव, लक्ष्मी रस्ता, पुणे २.

**कुलकर्णी, श्रीविलास दत्तात्रेय** ( २७–५–१९३८ ). ग्रं. प्र.; लेखनिक, महाराष्ट्र प्रा. ग्रंथालय, १९६२→पत्ता : १०२४ सदाशिव, नागनाथ पाराजवळ, पुणे २.

**केळकर, पांडुरंग वासुदेव** ( २२–११–१९३८ ). ग्रं. प्र.; ग्रं. लेखनिक, स. प. महाविद्यालय, १९६४→पत्ता : ११०/५ नवी पेठ, फडणीस वाडा, पुणे २.

**कोकाटे, राजाराम बळवंत** ( २६–६–१९१६ ). साहा. ग्रंथपाल, नू. म. वि. प्रशाला, १९३६→पत्ता –११८ रविवार, भारत हायस्कूलजवळ, पुणे २.

**कोंडे-देशमुख, एस्. पी.** ग्रंथपाल, श्री शिवाजी मराठा हायस्कूल ग्रंथालय, शुक्रवार पेठ, पुणे २.

**कोल्हटकर, वासुदेव पुरुषोत्तम** ( २१–६–१९११ ). बी. ए. ( १९३३ ), बी. टी. ( मुंबई, १९४० ), डिप्. लिब्. ( मद्रास, १९४२ ).; ग्रंथपाल, नू. म. वि. प्रशाला, १९४३–४६; तंत्रज्ञ साहाय्यक, महाराष्ट्र ग्रंथालय, १९४७–४९; ग्रंथपाल, महाराष्ट्र ग्रंथालय, १९४९→

कार्य–संस्थापक व कार्यवाह, पुणे ग्रंथालय संघ; संस्थापक व अध्यापक, ग्रं. वर्ग, पुणे ग्रंथालय संघ; अध्यापक, मुख्याध्यापक ( १९५६ ), ग्रं. वर्ग, महाराष्ट्र ग्रं. सं.; कार्यवाह, पहिली महाराष्ट्र ग्रंथालय परिषद, १९४९; महाराष्ट्र ग्रंथालय संघाच्या कार्यात कार्यकारी मंडळ, नियामक मंडळ, साहित्य सहकार–संपादक मंडळ व इतर विविध समित्यांमध्ये सुरुवातीपासून कार्य; सदस्य, नियामक मंडळ, महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघ, १९६२–६६, कार्याध्यक्ष, १९६७—;

प्रका—( १ ) ग्रंथालयाची व्यवस्था ( २ ) ग्रंथालयीन सूचिलेखन ( ३ ) ग्रंथालयीन वर्गीकरण ( ४ ) शालेय व वर्गणी ग्रंथालयाकरिता वर्गीकरण ( ५ ) ग्रंथपालनाचे आप्त ( ६ ) संदर्भ शास्त्र ( साहाय्याने ) ( ७ ) मराठी ललित वाङ्मयाचे वर्गीकरण ( अनु. ), ( ८ ) पद्मश्री डॉ. रंगनाथन् यांची ग्रंथवर्गीकरणाची कोलन पद्धती ( ९ ) साहित्य सहकार, ग्रंथपाल, तसेच मराठी वृत्तपत्रे व मासिकांमध्ये विपुल लेखन ( १० ) आकाशवाणीवर भाषणे. पत्ता– ५८० सदाशिव, बॅ. गाडगीळ रस्ता, पुणे २.

**खरे, सौ. सविता दामोदर** ( २७–१०–१९३७ ). बी. ए. ( ऑ. ), डिप्.

लिब्.; ग्रंथपाल, हुजूरपागा हायस्कूल, १९६१–६२; ग्रं. सा., गोखले इन्स्टिट्यूट, १९६२→पत्ता– ५९३ सदाशिव, हौदाजवळ, गोखले वाडा, पुणे २.

**खवले, सुधाकर नामदेव** ( १९३३ ). ग्रं. सा., डेक्कन कॉलेज, पुणे ६.

**खासनीस, राघवेंद्र नारायण** ( २–३–१९३३ ). एम्. ए., डिप्. लिब्. ( मुंबई, १९५५ ).; ग्रंथपाल, स. प. महाविद्यालय, १९५७–६४; ग्रंथपाल, बी. व्ही. एम्. इंजिनियरिंग कॉलेज, वल्लभ विद्यानगर, १९६४–६५; ग्रंथपाल, एम्. ई.एस्. कॉलेज, १९६६→पत्ता– ११–१४८ लोकमान्यनगर, नवी पेठ, पुणे ९.

**गंधे, शांताराम रंगनाथ** ( ८–८–१९३९ ). ग्रं. प्र.; ग्रंथपाल, अ. वि. गृह, १९६२–६४; ग्रं. सा., स. प. महाविद्यालय, १९६४→पत्ता–१३९६ ( नवा ) सदाशिव, परांजपे चाळ, खुन्या मुरलीधराजवळ, पुणे २.

**गर्दे, वसंत नारायण** ( २२–७–१९३० ). बी. ए., डिप्. लिब् ( पुणे, १९५९ ); ग्रं. सा., जयकर ग्रंथालय, पुणे विद्यापीठ, १९६०→पत्ता–९२ शुक्रवार, मंडईजवळ, पुणे २.

**गलांडे, अनंत दत्तात्रय** ( ३१–१–१९२९ ). बी. एस्सी., एल्.एल्. बी., डिप्. लिब्. ( पुणे ); ग्रंथपाल, मुधोजी कॉलेज, फलटण, १९६२; तांत्रिक साहाय्यक, हिंदुस्थान ॲंटिबायोटिक्स लि., पिंपरी. १९६३→पत्ता–१२८४ सुभाषनगर, पुणे २.

**गाडगीळ, डॉ. धनंजय रामचंद्र** ( १०–४–१९०१ ). एम्. ए., एम्. लिट्. गोखले इन्स्टिट्यूटचे माजी संचालक, सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ. विश्वस्त, केसरी मराठा संस्था, कुलगुरु, पुणे विद्यापीठ. हिंद सेवक संघाचे ग्रंथालयाचे प्रमुख अधिकारी म्हणून १९३०–१९५१ पर्यंत काम पाहिले. गोखले इन्स्टिट्यूटच्या समृद्ध ग्रंथालय उभारणीचे कार्य, ग्रंथालय चळवळीबाबत आस्था व सक्रीय साह्य सहकार्य. अध्यक्ष, पुणे ग्रंथालय संघ, १९४५–४९; अध्यक्ष महाराष्ट्र प्रादेशिक ग्रंथालय समिती, १९४७–५४. पत्ता–१२९ बी, एरंडवणा, पुणे ४.

**गाडगीळ, माधव लक्ष्मण** ( ९–४–१९२९ ). बी. ए., डिप्. लिब्. ( मुंबई ); ग्रं. सा., डेक्कन कॉलेज १९४९–५०; पुणे विद्यापीठ ग्रंथालय, १९५०–५४ ग्रंथपाल, को. ऑप. ट्रेनिंग कॉलेज १९५४–६०; चालक व मालक, पॉप्युलर मॅगेझिन लायब्ररी ॲन्ड बुक स्टॉल, डे. जिमखाना, १९६१→पत्ता– ११८० शुक्रवार, मंगळदास मॅन्शन, शिवाजी मराठा प्रशालेसमोर, पुणे २.

**गुत्ती, गोपाळ वासुदेव** ( १२–४–१९१५ ). हिशेब लेखनिक, पुणे नगर वाचन मंदिर, सहा वर्षे. पत्ता : १९६।४८ सदाशिव, मंगलभुवन, पुणे २.

# विभाग ६ वा

## काही दिवंगत व्यक्ती

**अमीन, मोतीभाई नरसीभाई** ( जन्म मृत्यू १९३९ ) बी. ए., वडोद्यांतील ग्रंथालय चळवळीचे आद्य प्रणेते; १९०६ साली बडोदे संस्थानात शिक्षक म्हणून नेमणूक झाल्यापासून श्री. अमीन यांनी ' मित्रमंडळ ' संस्था काढण्यास सुरवात केली. या मित्रमंडळाच्या द्वारा दरबारकडून आर्थिक मदत मिळवून त्यांनी ठिकठिकाणी ग्रंथालये स्थापन करण्यास प्रारंभ केला. अशा रीतीने त्यांनी २४८ ग्रंथालये स्थापन केली. पुढे ग्रंथालयखाते अस्तित्वात आल्यावर १९१३ साली ' ॲक्टिंग क्युरेटर ' म्हणून काम केले. त्यानंतर ' असिस्टंट क्युरेटर ऑफ् लायब्ररीज ' म्हणून १९३५ पर्यंत काम केले. त्याचेकडे खेड्यातील ग्रंथालयाची संघटना व व्यवस्था त्यासंबंधीचे काम होते व ते उत्कृष्टपणे त्यांनी केले आहे. त्यांना ग्रंथपाल म्हणण्यापेक्षा निष्ठावंत ग्रंथालयीन कार्यकर्ते असेच म्हणावे लागेल.

**कर्वे, रघुनाथ परशुराम** ( जन्म १८८९ मृत्यू २३-२-१९५६ ). मुंबई राज्याचे आद्य ग्रंथाधिपाल.

जन्म जुन्नर जवळच्या चास-कमान गावी. मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण जुन्नरला त्याचे मामा नानासाहेब जोशी यांच्याकडे झाल्यावर त्यांनी पुण्यास येऊन मे. ' डैरेक्टर आफ पब्लिक इंन्स्ट्रक्षण ' यान्या कचेरीत कारकुनी पत्करली. ह्या काळात पहिली राष्ट्रीय चळवळ जोरात चालू होती आणि इतर हजारो महाराष्ट्रीय तरुणांप्रमाणे तेही राष्ट्रीय मतांचे व स्वदेशी व्रतपालन करणारे झाले. पुढे ना. बाळासाहेब खेरांशी संबंध आल्यावर ते खादीधारी बनले व शेवटपर्यंत खादीधारी राहिले.

पुण्यांत ४-५ वर्षे नोकरी केल्यावर सुमारे १९१५ पासून ते मुंबईच्या लॉ क्लासात ( हल्लीचे लॉ कॉलेज ) कारकून झाले. कामात चोख आणि नेकीचे इतकेच नव्हे तर अनेक वेळा प्रिन्सिपॉलना सल्ला देण्याइतके बुद्धिमान असल्याने कर्वे यांजवर वाडिया, मुल्ला, पैझी, जयकर, खेर अशा कायदेपंडितांची मर्जी बसली. पुढे त्यांस लॉ कॉलेजच्या रजिस्ट्रारची जागा मिळाली. १९४० चे सुमारास लॉ

कॉलेजची नवी इमारत त्यांच्या सक्त देखरेखीखाली तयार झाली आणि तीन लाखांच्या अंदाजात अर्धा लाख बचत झाली. दुसऱ्या महायुद्धाच्या आधीच्या स्वस्ताईतली ही घटना आहे. अनेक महत्त्वाच्या रिपोर्टांचे मसुदे रा. कर्वे यांनी तयार केले आहेत. माहितीचे संकलन करून मुद्दे काढणे, नियम तयार करणे, अहवाल लिहिणे या कामात ते अत्यंत निष्णात असल्याने मोठमोठे कार्यकर्ते त्यांजकडून मसुदे तयार करवून घेत. माटुंग्यास त्यांनी दक्षिणी ब्राह्मण हाऊसिंग सोसायटी स्थापन करून एक चाळ बांधली हे एक मोठे सामाजिक कार्य त्यांच्या हातून घडलेले आहे.

सेवानिवृत्त होण्याच्या आधी त्यांनी हायकोर्ट प्लीडरची परीक्षा दिली व तीत ते सहज उत्तीर्ण झाले. त्यांनी सनदही काढली होती. परंतु वकिली करण्यास त्यांना अवसर मिळाला नाही; कारण मुंबई सरकारने त्यांस लायब्ररी डेव्हलपमेंट कमिटीचे चिटणीस नेमले. कमिटीचा अहवाल कर्वे यांनी परिश्रमपूर्वक लिहिण्यापूर्वी मुंबई राज्य, बडोदे राज्य व इतरत्र पहाणी केली होती. दरवर्षी वाढत जाणारी अनुदाने ग्रंथालयांस देऊन त्यांच्या वाढत्या गरजा भागवीत जाव्या अशी दूरदृष्टीची सूचना त्यांनी केली होती. १९४६ ते ४९ पर्यंत ते ग्रंथालयाधिपाल (क्यूरेटर ऑफ लायब्ररीज) म्हणून काम करीत होते. त्या अवधीत त्यांनी मुंबई, पुणे, अहमदाबाद, धारवाड येथील केंद्रीय व प्रादेशिक ग्रंथालये आणि जिल्ह्यांची आणि काही तालुका ग्रंथालये सुरू केली.

१९५० त त्यांची आयुर्वेद बोर्डावर नेमणूक झाली. ते काम दोन वर्षांनी पूर्ण करून ते पुण्यास डॉ. मु. रा. जयकर यांच्या आत्मचरित्राची सामग्री सिद्ध करण्याच त्यांच्या निमंत्रणावरून आले. ह्या कामात त्यांनी अविश्रांत मेहनत घेतली. १९५२ पासून मृत्यूपर्यंत साडेतीन वर्षांत रजा न घेता दिवसातून सातसात तास काम केले; श्री. बाबासाहेब जयकरांनीसुद्धा इतके काम करू नका असे त्यांस वारंवार बजाविले परंतु कर्व्यांनी ऐकिले नाही व त्याचा परिणाम मेंदूवर झाला. शेवटचे १५ दिवस मेंदूची व्याधी वाढत गेली व त्यांतच त्यांना मृत्यू झाला.

टागोर, प्रो. विष्णू गोविंद विजापूरकर, सर जगदीशचंद्र बसू यांची चरित्रे, कार्ले–भाजे कोरीव लेणी ही पुस्तके प्रसिद्ध.

**कापडी, सदानंद लक्ष्मण** ( जन्म ६–७–१८९१ मृत्यू १६–२–१९६७ ). बी. एस्सी ( मुंबई, १९१४ ). रत्नागिरी हायस्कूलमधून १९०९ साली मॅट्रिक व सरकारी स्कूल फायनल परीक्षा सन्मानाने उत्तीर्ण. विल्सन कॉलेजात महाविद्यालयीन शिक्षण. १९१४ साली बी. एस्सी. परीक्षा द्वितीय वर्गात ( परंतु सर्वप्रथम ) उत्तीर्ण. त्यानंतर दोन वर्षे शिक्षक म्हणून काम केले. १९१६ साली 'बॉम्बे ब्रँच रॉयल एशियाटिक सोसायटीच्या' ग्रंथालयांत साहाय्यक ग्रंथपाल म्हणून नेमणूक. नंतर काही वर्षांनी ग्रंथपाल म्हणून नेमणूक. जाने. १९५१ मध्ये सेवानिवृत्त.

कार्य–१९३९ साली मुंबई सरकारने प्रा. फैझी यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या 'पुस्तकालय विकास समिती'चे सभासद म्हणून काम. मुंबई येथील मध्यवर्ती ग्रंथालयाची जबाबदारी सुरुवातीला त्यांचेवरच सोपविण्यात आली होती. मुंबई ग्रंथालय संघाचे संस्थापक सदस्य व काही वर्षे अध्यक्ष. महाराष्ट्र ग्रंथालय संघाचे काही वर्षे उपाध्यक्ष व मुंबई येथील ग्रं. वर्गात अध्यापन ( १९५१ ). ते नोकरीला लागले त्यावेळी इतर ग्रंथपालनाच्या शिक्षणाची व्यवस्था नव्हती. तरी अभ्यासूवृत्तीमुळे ग्रंथालयाचा कारभार उत्तम तऱ्हेने हाकला. "श्री. कापडी हे एक सर्व बाजूंनी आदर्श ग्रंथालय–पालक आहेत" असा अभिप्राय प्रा. न. र. फाटक यानी म. रा. ग्रं. परिषदेच्या अध्यक्षीय भाषणात व्यक्त केला होता. इतर कार्य– मुंबई येथील 'चिकित्सक समूह' शिक्षणसंस्थेचे अनेक वर्षे अध्यक्ष. सारस्वत विद्यार्थीसाहाय्यक मंडळी, सारस्वत दीन-वत्सल संघ, संयुक्त गौ. सा. ब्रा. परिषद या संस्थांचे कार्यकर्ते. होमिओपाथी वैद्यकशास्त्राचा सखोल अभ्यास. ते अविवाहित होते. दीर्घ आजारानंतर गुरुवार दि. १६ फेब्रुवारी १९६७ रोजी सकाळी देवाज्ञा झाली.

**कुंटे, म. मो.** ( जन्म मृत्यू १९६६ ) पाली ( ता. सुधागड, जिल्हा कुलाबा ) येथील सार्वजनिक वाचनालयाचे कार्यकर्ते.

**कुंटे, वाय्. के.** यांना ग्रंथपालनाचे शिक्षण घेण्यासाठी मुंबई विद्यापीठाने १९१३ मध्ये इंग्लंडला पाठविले होते. शिक्षण घेऊन परत आल्यावर सुमारे १ वर्ष मुंबई विद्यापीठाचे ग्रंथपाल म्हणून काम पाहिले. परंतु त्याचे आकस्मिकपणे निधन झाले.

**कुडाळकर, जनार्दन सखाराम** ( जन्म १८८२ मृत्यू १३–३–१९२१ ). एम्. ए., एलएल. बी. बडोदा संस्थानातील स्टेट लायब्ररीचे क्यूरेटर १९१५–२१. त्याआधी १९१३ व १९१४ साली जगातील ग्रंथालयांची व्यवस्था पाहण्यासाठी बडोदे सरकारांनी पाठविले होते. "श्रीमंत महाराज

सयाजीराव गायकवाड यांनी त्यांस युरोप व अमेरिका देशांत २ वर्षे लायब्ररींची व्यवस्था व टीप शिकण्यास पाठविले होते व गेल्या [ काही ] वर्षांत त्यांनी बडोद्यातील लायब्ररींची व्यवस्था किता घेण्यासारखी केली आहे " असे " मुमुक्षु " कारांनी म्हटले आहे. न्यूयॉर्कला लायब्ररी असोसिएशनचे अधिवेशन २२ ते २७ सप्टेंबर १९१३ मध्ये भरले होते. त्या परिषदेस कुडाळकर गेले होते. त्यांनी " लायब्ररी मिसलेनी " नामक त्रैमासिक चालविले होते. ( वर्ष १, अंक १, ऑगस्ट १९१२ ते वर्ष ६, अंक १, मे १९१९ ) व त्याचे संपादक म्हणून काम करीत होते. मद्रास येथे १९१९ मध्ये भरलेल्या अखिल भारतीय ग्रंथालय परिषदेचे अध्यक्षस्थानहि भूषविले होते. आपल्या कारकीर्दीत त्यांनी बडोद्याच्या सेंट्रल लायब्ररीमधील मराठी पुस्तकांच्या सूच्या प्रसिद्ध केल्या तसेच " मराठी पुस्तकांसाठी वर्गीकरणपद्धती " हे पुस्तक १९१६ मध्ये प्रसिद्ध केले. वयाच्या ३९ वे वर्षी दिवंगत झाले.

**कुलकर्णी, रामभाऊ काशीनाथ** ( जन्म  मृत्यू २३-५-१९६३ ). ग्रंथपाल, काकाणी नगर वाचनालय, मालेगाव. सतत ३५ वर्षे सेवा. " रामभाऊ म्हणजेच वाचनालय असे समीकरण झाले होते. वाचनालयाची अंतर्गत व्यवस्था, लेखी काम व संस्थेच्या प्रगतीच्या दृष्टीने जे जे करता येणे शक्य होते त्या सर्व गोष्टी कै. रामभाऊ करीत. त्यामुळे अधिकारी वर्गाचे बरेचसे काम हलके होई. संस्थेचे आजचे भव्य स्वरूप दिसत आहे त्याचे बरेचसे श्रेय कै. रामभाऊंनाच आहे " अशा शब्दात त्याचे कार्याचा गौरव काकाणी वाचनालयाने केला आहे. ग्रंथालयाच्या शताब्दीनिमित्त मालेगाव येथे ग्रंथालय परिषद व्हावी अशी त्यांची मनापासून इच्छा होती व त्या दृष्टीने औरंगाबाद येथे १९६२ मध्ये भरलेल्या ग्रंथालय परिषदेत आमंत्रणही दिले होते. परंतु ग्रंथालय परिषद व शताब्दी समारंभाचा सोहळा पाहण्याच्या आतच क्रूर काळाने रामभाऊंना ओढून नेले.

**केळकर, नरसिंह चिंतामण तथा तात्यासाहेब** ( जन्म २६-८-१८७२ मृत्यू १४-१०-१९४७ ). साहित्यसम्राट, प्रमुख महाराष्ट्रीय राजकारणी साहित्यिक व वृत्तपत्रकार. संपादक, केसरी, मराठा; संस्थापक व संपादक, सह्याद्रि मासिक; विश्वस्त, केसरी मराठा संस्था. ग्रंथ व ग्रंथालयप्रेमी लोकनेते.

' ज्ञानाची सदावर्ते ' हा प्रसिद्ध लेख केसरीमध्ये १७ ऑक्टोबर १९११ रोजी लिहून ग्रंथालयाचे महत्त्व प्रतिपादन केले. त्याचवेळी स्थापन झालेल्या ( ११-१०-१९११ ) पुणे मराठी ग्रंथालयाच्या वाढीस हातभार लावला. ही संस्था प्रथम कै. न. चिं. केळकर यांच्या वाड्यात एका सोयीस्कर जागेत होती. या ग्रंथालयाचे उपाध्यक्ष ( शके १८३३-५५ ) व अध्यक्ष ( शके

१८५५-६१ ) म्हणून काम पाहिले. पुणे नगरवाचन मंदिराच्या कार्यातही भाग-कार्यकारी मंडळ सदस्य १८९८-९९ व अध्यक्ष १९३७. १९२१ मध्ये भरलेल्या महाराष्ट्रीय मोफत वाचनालय परिषदेस मार्गदर्शन व त्यामध्ये स्थापन झालेल्या महाराष्ट्रीय वाचनालय संघाचे अध्यक्षपद भूषविले. केसरी मराठा ग्रंथशाला स्थापना ( १९३२ ) व तिचे वाढीसाठी प्रयत्न. अनेक ग्रंथालयांच्या वार्षिकोत्सवास, समारंभास अध्यक्ष वा वक्ते म्हणून उपस्थित.

**फोरटकर, ना. केशवराव** अध्यक्ष, महाराष्ट्रीय ( सार्वजनिक ) वाचनालय परिषद, २ री, पुणे, १९२६. हैद्राबादच्या मराठी ग्रंथसंग्रहालयाचे आधारस्तंभ.

**कोल्हटकर, विठ्ठल महादेव तथा काका** ( जन्म २०-९-१८८७ मृत्यू जुलै १९५२, आषाढ शुद्ध सप्तमी ). जयपूर कॉलेजमध्ये इंटरपर्यंत शिक्षण, ग्रंथपाल, फर्ग्युसन महाविद्यालय, १९१६-२२; ग्रंथपाल, स. प. महाविद्यालय, १९२२ ते ९-६-१९४७.

पुण्यातील त्यावेळचे पहिले प्रशिक्षित ग्रथपाल. त्यांनी लाहोर येथून पत्रव्यवहाराने अभ्यास करून व परीक्षा देऊन ग्रं. प्रमाणपत्र मिळविले ( १९२४ ). अनेकांना ग्रंथपालन व्यवसायात पदार्पण करण्यास व शिक्षण घेण्यास प्रोत्साहन. ग्रंथपाल, भारत इतिहास सं. मंडळ १९२२-४७. कै. सर रामकृष्ण भांडारकर यांचेकडे काही दिवस रीडर म्हणून काम. संस्कृत, गुजराथी, इंग्रजी, मराठी, कानडी, हिंदी या भाषा उत्तम येत होत्या. फ्रेंच व जर्मन भाषाचाही अभ्यास. ग्रंथपाल म्हणून ग्रंथालय परिषदांना उपस्थित, निबंध वाचन. राष्ट्रभाषा प्रचारक मंडळात काम करीत होते. 'कोविद' परीक्षा पहिल्या बॅचमध्ये दिली व त्यांना पूज्य महात्मा गांधीजींच्या हस्ते शाल मिळाली होती.

**खेर, बाळ गंगाधर ऊर्फ बाळासाहेब** ( जन्म २४-८-१८८८ मृत्यू ८-३-१९५७ ). बी. ए., एलएल्. बी. मुंबई प्रांताचे पहिले मुख्यप्रधान व शिक्षणमंत्री १९३७-३९ व १९४६-५२; भारताचे लंडन येथील हाय-कमिशनर; ऑफिशियल लँग्वेजेस कमिशनचे अध्यक्ष.

यांच्या कारकीर्दीत प्रौढ शिक्षण व साक्षरताप्रसाराच्या योजना कार्यवाहीत आणल्या गेल्या. पैकी याचे अध्यक्षतेखाली पुस्तकालय विकास समिती स्थापन; पैकी समितीच्या शिफारसीप्रमाणे केंद्रीय, प्रादेशिक, तसेच जिल्हा, तालुका व शहर ग्रंथालयांची स्थापना.

अध्यक्ष, मुंबई, उपनगर व ठाणे जिल्हा वाचनालय परिषद, अधिवेशन २ रे, मुंबई, १९४५. त्यातील ठरावानुसार स्थापन झालेल्या मराठी ग्रंथालय संघाचे अध्यक्षपदही त्यांनी भूषविले. अध्यक्ष, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय सुवर्ण महोत्सव.

गायकवाड, श्रीमंत सर सयाजीराव महाराज (१८६३–१९३९) सेना खासखेल, समशेर बहादूर, फर्झंद–इ–खास–इ–दौलत–इ–इंग्लिशिया, जी. सी. एस्. आय., जी. सी. आय. ई., एल्एल्. डी. बडोदे संस्थानचे अधिपति.

१९१० मध्ये अमेरिकेतील ग्रंथालयांची पाहणी केल्यानंतर अमेरिकेप्रमाणेच आपल्याही संस्थानात नमुनेदार ग्रंथालये स्थापन करावीत अशी इच्छा महाराजांना झाली. त्यानुसार अमेरिकेतील ग्रंथालयतज्ज्ञ श्री. बॉर्डेन यांस बोलावून आणून ग्रंथालयाचे स्वतंत्र खाते निर्माण केले व त्यानुसार सार्वजनिक मोफत वाचनालयांची तसेच केंद्रीय व फिरत्या ग्रंथालयांची स्थापना केली. ग्रंथालयशास्त्राचे अद्ययावत ज्ञान घेण्यासाठी अनेकांना परदेशांत पाठविले. ग्रंथपालनाचे शिक्षणक्रम सुरू केले. 'लायब्ररी मिसलेनी' हे ग्रंथालय विषयीचे पहिले मासिक सुरू केले. १९११ मध्ये त्यांनी आपल्याजवळजी निवडक अशी सुमारे २० हजार पुस्तके देऊन मध्यवर्ती ग्रंथालयाची उभारणी केली. याशिवाय महाराजांनी दोन लाख रुपयांची देणगी देऊन बनारस हिंदू विश्वविद्यालयाला एक प्रासादतुल्य मंदिर ग्रंथालयासाठी बांधून दिले आहे. म्हणूनच त्या ग्रंथालयाला 'सर सयाजीराव गायकवाड ग्रंथालय' असे नाव दिले आहे. महाराजांच्या ग्रंथालयविषयक २५ वर्षांच्या कार्यकर्तृत्वाचे व ग्रंथालयप्रेमाचे ते एक अखिल भारतीय प्रतीकच आहे असे म्हटले पाहिजे.

अशा तऱ्हेने राज्यकर्ते ग्रंथालयप्रेमी असले तर आदर्श ग्रंथालयांची स्थापना व त्यांचे संवर्धन कशा प्रकारे करता येते याचे उदाहरण घालून दिले.

गाळवणकर, नारायण गणेश (जन्म : मार्च १८८९ मृत्यू १५–१०–१९६३). शिक्षण–मराठी सहावी व इंग्रजी पहिली. व्यवसाय–शेती व काही वर्षे मोत्याचा धंदा. कार्य–चिटणीस, वर्तमानपत्रसंग्रह सद्‌बोध वाचनालय वसई, १९१९; चिटणीस, वाचनालय, वसई, १९२२; चिटणीस, मराठी ग्रंथसंग्रहालय व मोफत वाचनालय, वसई तालुका; सदस्य, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय; आजीव सदस्य, महाराष्ट्र ग्रं. संघ; १९६२ पर्यंतच्या सर्व ग्रंथालय परिषदांना उपस्थित व कार्यात भाग. इतर कार्य–पूर्वीच्या वसई तालुका बोर्डाचे अध्यक्ष, १९२६–३९; वसई नगरपालिकेचे सदस्य ११ वर्षे व १ वर्ष चेअरमन; ठाणे जिल्हा लोकल बोर्डाचे सभासद, ६ वर्षे; मुंबई सरकारचे स्कार लँड बोर्डाचे सदस्य, जे. पी. व ऑनररी मॅजिस्ट्रेट होते; स्वातंत्र्यसंग्रामांत २।३ वेळा कारावास–एकूण १८ महिने तुरुंगात.

गोखले, डॉ. वासुदेव दामोदर (जन्म ३०–११–१८९८ मृत्यू १२–६–१९६४). एम्. ए., बी. टी., पी. एच्. डी.; शिक्षक, महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कर्तबगार चिटणीस व साहित्यिक.

कार्य–काही वर्षे कार्यकारी मंडळ सदस्य, व काही काल कार्यवाह, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय. महाराष्ट्र ग्रंथालय संघाचे आजीव सदस्य व ग्रंथपालन वर्गात 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' या विषयाचे अध्यापक म्हणून कार्य.

**गोठोस्कर, पी. वी.** (जन्म मृत्यू ). बी. ए., ग्रंथपाल, बॉम्बे ब्रांच ऑफ द रॉयल एशियाटिक सोसायटी. यांनी आपल्या कारकीर्दीत आपल्या ग्रंथालयातील पुस्तकांची पुनर्रचना केली व सुमारे १ लाख पुस्तकांची विषयवार व लेखकांची सूची तयार करून प्रसिद्ध केली. १९१७ पर्यंतच्या भारतीय व परदेशी पुस्तकांची ती एकप्रकारे सर्वसंग्राहक सूचीच होय.

प्रका–(१) जनरल कॅटलॉग ऑफ द लायब्ररी ऑफ दि बॉम्बे ब्राच ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी. रिव्हाईजड अँड ब्रॉट अप टु दि एन्ड ऑफ १९१५ भाग १–ऑथर्स, १००३ पृष्ठे, भाग २– सब्जेक्ट्स १२४८+२ पृष्ठे अनुक्रमे १९१७ व १९२२ मध्ये प्रसिद्ध.

**जयकर, बॅ. मुकुंद रामराव [तथा डॉ. बाबासाहेब जयकर]** (जन्म १३–११–१८७३ मृत्यू १०–३–१९५९). राइट ऑनरेबल, एम्. ए., एल्. एल्. डी., डी. सी. एल, पी. सी. प्रख्यात कायदेपंडित, उत्तम वक्ते व लोकाग्रणी., कुलगुरु, पुणे विद्यापीठ १९४८–१९५६.

अध्यक्ष, महाराष्ट्रीय मोफत वाचनालय परिषद, १ ली, पुणे, १९२१. पुणे विद्यापीठाच्या ग्रंथालयाची उभारणी. त्यांचे ग्रंथालयावर फार प्रेम होते म्हणून त्यांचे स्मरणार्थ पुणे विद्यापीठाच्या ग्रंथालयाला "जयकर ग्रंथालय" हे नाव भारताचे राष्ट्रपति डॉ. राधाकृष्णन् याचे अध्यक्षतेखाली देण्यात आले. त्यांना पुस्तकांचे फार वेड होते. त्यांचा वैयक्तिक ग्रंथसंग्रह फार मोठा होता व त्याची व्यवस्थाही उत्तम ठेवली होती. *मृत्यूनंतर त्यांनी पुण्याच्या लॉ कॉलेजास व जयकर* ग्रंथालयास ग्रंथसंग्रह देणगीदाखल दिला.

**जोशी, प्रा. चिंतामण विनायक** (जन्म १९–१–१८९२ मृत्यू २१–११–१९६३). मराठीतील ख्यातनाम विनोदी लेखक, पालीचे प्राध्यापक (बडोदा) बौद्ध वाङ्मयाचे पंडित. अहमदनगर येथे १९३९ साली महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे २३ वे अधिवेशनप्रसंगी ग्रंथालये व वाचनालये यांच्या कार्यकर्त्यांची परिषद भरली होती (९–१–१९३९) तिचे अध्यक्षस्थान भूषविले होते. उपाध्यक्ष, महाराष्ट्र ग्रंथालय संघ, १९५४ अध्यक्ष, पुणे नगर वाचन मंदिर.

**जोशी, दत्तात्रय वामन** (जन्म १८९९ मृत्यू २०–३–१९५४). बी. ए., बी. टी., एस्. टी. सी. महाराष्ट्रातील ग्रंथालय चळवळीचे प्रमुख प्रणेते व सर्वात जुने चळवळीचे कार्यकर्ते.

श्री. दत्तोपंत जोशी यांनी आपल्या आयुष्यात अनेक चळवळी घेतल्या. स्वस्थ बसून राहणे ही त्यांची प्रकृतीच नव्हती. १९२० सालापासून ते सार्वजनिक जीवनात

भाग घेऊ लागले. पुणे येथे केसरीचे संपादक कै. तात्यासाहेब केळकर यांचे लेखक म्हणून काम करीत असतानाच ग्रंथालय चळवळीकडे त्यांचे लक्ष वेधले व ही चळवळ त्यांचा स्थायीभाव बनली. त्या आधी अनाथ विद्यार्थी गृहाचे मोफ्त वाचनालयात व सहकारी मोफत वाचनालयात काम केले होते. सेनापती बापटांच्या मुळशी सत्याग्रहात भाग. कै. गो. कृ. देवधर, प्रेसिडेंट, सर्व्हंटस ऑफ इंडिया सोसायटी, पुणे यांचे मदतनीस लेखक, कै. इतिहासाचार्य चिं. वि. वैद्य (चीफ जस्टिस, ग्वाल्हेर) यांचे लेखक, प्राथमिक व दुय्यम शाळा, ट्रेनिंग कॉलेज यामध्ये मुख्याध्यापकाचे कार्य, प्रथम पुणे व नंतर मुंबई येथे.

कार्य–१९२१ मध्ये स्थापन झालेल्या महाराष्ट्रीय वाचनालय संघाचे कार्यवाह. या संघातर्फे १९२६ व १९३९ मध्ये ग्रंथालय परिषदा भरविण्यात पुढाकार. म्युनिसिपालिट्यांकडून सार्वजनिक वाचनालयांना वार्षिक मदत देण्याचे यशस्वी प्रयत्न केले, साक्षरता प्रसाराचे कार्य, १९३६ मध्ये संघाच्या खटपटीने रा. ब. सी. के. बोले यांचेमार्फत मुंबई कायदे कौन्सिलमध्ये 'बॉम्बे पब्लिक लायब्ररीज बिल' आणले, वाचनाल्यांची नोंदणी करणे, सभासद वाचनाल्यांना वर्तमानपत्रे व मासिके सवलतीच्या वर्गणीत मिळवून देणे, इ. कार्य.

संस्थापक सदस्य, मुंबई ग्रंथालय संघ व त्यामध्ये कार्य; संस्थापक सदस्य व कार्यवाह, महाराष्ट्र लायब्ररी स्टाफ युनियन व त्यातर्फे ग्रंथालय सेवकांच्या वेतनश्रेणीत व सेवानियमांत सुधारणा करण्याचे प्रयत्न. संस्थापक सदस्य, महाराष्ट्र ग्रंथालय संघ. संस्थापक सदस्य, इंडियन लायब्ररी असोसिएशन (१९३४) व अनेक वर्षे कौन्सिल सभासद.

**तिरखरेकर,** जी. के ग्रंथपाल, बॉम्बे ब्रांच ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी १९०० च्या आधीच्या कालखंडांतील.

**दंडवते, गणेश रंगनाथ** (जन्म १८८६ मृत्यू ) लायब्रेरियन, सेंट्रल लायब्ररी, बडोदा. मराठी व हिंदी पुस्तकांच्या विभागाचे ते प्रमुख होते. अमेरिकन बुक रिव्ह्यू डायजेस्टच्या धर्तीवर त्यांनी मासिकही काही वर्षे चालविले होते. १९२८ मध्ये त्यांचेकडे इंग्रजी पुस्तके ॲक्सेशन करण्याचे तसेच उर्दू व हिंदी पुस्तकाचे तालिकीकरणाचे काम देण्यात आले होते.

प्रका–(१) भारत नियतकालिक दीपिका. (१९१५). (२) महाराष्ट्र नियतकालिक दीपिका (सन १९२१) (१९२२). (३) प्रगति. (१९१७) (४) अर्वाचीन मराठी वाङ्मय–मध्यकाळ–पूर्वार्ध (१८५७–१८८५). (१९२४) (५) बडोद्याचे मराठी साहित्य. (१९२५) (६) संक्षिप्त अर्वाचीन मराठी वाङ्मय (१८०५–१९२७). (१९२९). (७) महाराष्ट्र नाट्यकला व नाट्यवाङ्मय (१८४३–१९३०). (१९३१). (८) कादंबरीची गोष्ट. (१९२७) (९) मराठी स्त्रीलेखकांची सूची (सन

१८७३ ते १९२१). (१९२१) (१०) सुलभ शिक्षण. (१९१८)

दत्त, न्यूटन मोहन (जन्म मृत्यू १०-१०-१९३५). बडोद्याचे स्टेट लायब्रेरियन, १९१५-२१; क्यूरेटर ऑफ लायब्ररीज, १९२१-३३. शिक्षण : मॅट्रिक. बडोदे सरकारच्या नोकरीत येण्यापूर्वी ते एका ग्रंथप्रकाशकाकडे ग्रंथविक्रेते म्हणून काम करीत होते. ॲक्टिंग क्यूरेटर ऑफ लायब्ररीज, १९१४; स्टेट लायब्रेरियन, १९१५-२१; (कुडाळकरांच्या निधनानंतर) क्यूरेटर ऑफ लायब्ररीज, १९२१-३३. महाराजाचे 'रीडर' म्हणूनही ते काम करीत होते. १९१८ मध्ये भारत सरकारने भारतातील ग्रंथालयांची परिषद लाहोर येथे बोलाविली होती त्यास बडोदा संस्थानचे प्रतिनिधी म्हणून भाग. १९३० साली काशी येथे भरलेल्या अखिल आशिया खंडाच्या शिक्षण परिषदेच्या ग्रंथालय विभागाचे अध्यक्ष, १९३१ मध्ये बंगालमध्ये भरलेल्या ग्रंथालय संमेलनाचे अध्यक्ष, पहिल्या जागतिक युद्धाच्या वेळी त्यानी आघाडीवरच्या जवानांना अनेक पुस्तके पाठवून युद्धकार्यात भाग घेतला होता. त्यांच्या या कामगिरीबद्दल लंडनच्या लायब्ररी असोसिएशनने १९२८ मध्ये त्यांना ऑनररी फेलोशिप (एफ. एल्. ए.) बहाल केली होती.

शिक्षण कमी असले तरी ग्रंथालयातील काम करण्याची त्यांना फार आवड होती. विशेषतः सूचिशास्त्र (बिब्लिओग्राफी) या विषयातील त्यांचे प्रावीण्य वाखाणण्यासारखे होते. सॉनेनशाईनच्या पंचखंडात्मक 'बेस्ट बुक्स' या सूचीच्या आधारे त्यांनी बडोद्याच्या मध्यवर्ती ग्रथालयातील ग्रंथसंग्रह समृद्ध केला. जे पुस्तक हवे असेल वा आणवायचे असेल त्यावर 'एस्' ही खूण करीत असत. या कामामध्ये त्यांना विद्वानांचे विशेषतः लंडन टाइम्सच्या संपादक मंडळावरील व्यक्तींचे सहकार्य मिळत असे. बडोद्याच्या महाराजांनीही या विद्वानांना उत्कृष्ट व नवनवीन पुस्तके बडोद्याच्या केंद्रीय ग्रंथालयाला पाठविण्याबाबत आदेशही दिले होते. अशा समृद्ध ग्रंथसंग्रहातील माहिती विशेषतः इंग्रजी पुस्तकांची आपल्या तल्लख स्मरणशक्तीच्या साहाय्याने अभ्यासकांना पुरवीत असत त्यामुळे अभ्यासक त्यांच्या संदर्भ साहाय्यावर खूष असत. सेवानिवृत्त झाल्यानंतर लंडन येथे राहत होते. तेथेच त्यांचे निधन झाले.

प्रका-(१) दि बरोडा लायब्ररी सिस्टिम (अ पेपर ऑन दि बरोडा लायब्ररी डिपार्टमेंट). १९१७ या पुस्तकाच्या पुढील आवृत्त्या खालीलप्रमाणे प्रसिद्ध झाल्या. (२) अ हॅंडबुक ऑफ दि बरोडा लायब्ररी डिपार्टमेंट. आ. २. १९२१. (३) दि लायब्ररी सिस्टिम ऑफ दि बरोडा स्टेट. आ. ३. १९२४. (४) दि बरोडा लायब्ररी हॅंडबुक. आ. ४. १९२६. (५) बरोडा अँड इट्स् लायब्ररीज : बुइथ थ्री लेक्चर्स ऑन लायब्ररीज अँड लिटरेचर बाय हि. हा. दि महाराजा गायकवाड. रिव्हाइज्ड अँड एन्लार्ज्ड एडिशन. १९२८.

**दलाल, नटचरलाल अंबालाल** (जन्म २७-४-१९१० मृत्यू २३-४-१९५८). बी. ए., डिप्. लिब्. ( इंपीरियल लायब्ररी, कलकत्ता ); ग्रंथपाल, स्कूल ऑफ् इकॉनॉमिक्स् अँड सोशिऑलॉजी, मुंबई, १९४०-५८. अध्यापक, ग्रंथपालन वर्ग, मुंबई विद्यापीठ ग्रंथालय, १९४३ पासून १२।१३ वर्षे ( लायब्ररी ऑर्गनायझेशन व तांत्रिकीकरण या विषयाचे ).

**दाते, शंकर गणेश** ( जन्म १७-८-१९०५, मृत्यू १०-१२-१९६४ ). जन्म रत्नागिरी येथे. बी. ए. पर्यंत शिक्षण. मराठी ग्रंथसूचिकार. ग्रंथसूचीच्या निमित्ताने ग्रंथालयाशी व ग्रंथपालांशी संबंध आला. कायद्यानुसार सरकारकडे येणाऱ्या ग्रंथसंग्रहाची व्यवस्था रेकॉर्ड ऑफिसकडे होती. तेथील दुरवस्था पाहून हा ग्रंथसंग्रह लोकांना उपयोगी पडण्याचे दृष्टीने प्रयत्न. त्यासाठी महाराष्ट्र प्रादेशिक ग्रंथालय स्थापन करण्यासाठी खटपट. म. प्रा. ग्रंथालयाचे ग्रंथपाल म्हणून १९४६ साली काम पाहिले. मराठी ग्रंथसूचीतील सर्व पुस्तकांचे दशांश वर्गीकरण पद्धतिप्रमाणे वर्गीकरण आवश्यक त्या सुधारणा व बदलासह केले. अनेक दुर्मिळ मराठी ग्रंथांचा संग्रह केला.

ग्रंथ-सूचीचे प्रचंड कार्य पुरे केल्याबद्दल महाराष्ट्र ग्रंथालय संघातर्फे न्या. मू. गजेंद्रगडकर यांचे अध्यक्षतेखाली दि. २५-६-१९६१ रोजी पुणे येथे सत्कार.

प्रका-( १ ) द्विबिंदुवर्गीकरणपद्धतीतील रोमी व अरबी वर्णांकचिन्हांचे जागी बालबोध चिन्हांची योजना : श्री. शि. रा. रंगनाथन् यांच्या 'कोलन' पद्धतीतील वर्गदर्शक रोमन अक्षरांचे ( कॅपिटल व स्मॉल ) नागरीकरण ( १९४६ ). ( २ ) ग्रंथ-सूचि-शास्त्र ( मराठी ग्रंथसूची प्रस्तावना खंडातील एक प्रकरण ). ( ३ ) मराठी ग्रंथालयांची सद्यःस्थिती व ती आदर्श करण्याचे मार्ग ( पहिल्या मराठी ग्रंथालय परिषदेत वाचलेला निबंध-'पंचारती' मध्ये प्रसिद्ध ). ( ४ ) मराठी-ग्रंथ-सूची ( १८००-१९३७ ) दोन खंड ( ५ ) मराठी ग्रंथ सूची ( १९३८-१९५० ) ( ६ ) लोककथा, २ भाग.

( अप्रसिद्ध व अपूर्ण ) १९५० पर्यंतच्या मराठी मासिकांच्या सूचीचा पहिला भाग तयार-१००० मराठी नियतकालिकांची वर्णनात्मक नोंद. दुसऱ्या भागात या नियतकालिकांतील लेखांची सूचि द्यावयाची हा संकल्प. हे अपुरे कार्य पुरे करण्याच्या प्रमुख उद्देशाने मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाने श्री. शं. ग. दाते सूचिमंडळ स्थापन केले आहे.

**देसाई, अनंत रत्नाकर** ( जन्म मृत्यू २८-७-१९५२ ). ग्रंथपाल, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय. १९०८ मध्ये मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयात नोकरीला लागले. ४० वर्षे सतत संस्थेची सेवा करून निवृत्त झाले ( २८-७-१९५० ). फारसे शिक्षण झालेले नसताही सतत व्यासंग आणि अभ्यासवृत्ती या द्वारा त्यांनी

ग्रंथालय क्षेत्रात चांगली प्रगती केली. कै. डॉ. केतकर, म. म. द. वा. पोतदार प्रभृति विद्वानांनीही त्यांच्या संदर्भसेवेचा गौरव केलेला होता.

**परब, लव गोविंदराव** (जन्म २०–७–१९१५ मृत्यू ३०–११–१९६५). एम. ए. (संस्कृत व पाली) बी. टी., डिप्. लिब्. (मुंबई); ग्रं. सा., मुंबई विद्यापीठ ग्रंथालय, १९५२–५३; ग्रंथपाल, सेंट्रल आर्किऑलॉजिकल लायब्ररी, नवी दिल्ली, १९५३–६४; ग्रंथपाल, शिवाजी विद्यापीठ ग्रंथालय, कोल्हापूर, सप्टेंबर १९६४– नोव्हें. ६५. शिवाजी विद्यापीठात सुरू केलेल्या ग्रं. वर्गाचे प्रमुख व अध्यापक म्हणून काम. त्याचा वैयक्तिक ग्रंथसंग्रह फार मोठा होता. अनेक ग्रंथालय परिषदांना उपस्थित व निबंध वाचन. मानद ग्रंथपाल म्हणून मुंबईच्या बी. ई. एल. हायस्कूलमध्ये १९४३–४५ व ओरिएंट हायस्कूलमध्ये १९५०–५२ पर्यंत काम केले. सदस्य, का. मंडळ दिल्ली ग्रं. संघ, १९५४–५७.

**प्रभुदेसाई, सौ. आनंदीबाई पी.** बडोद्याच्या मध्यवर्ती ग्रंथालयातील बाल विभागाच्या प्रमुख. याशिवाय मराठी कॅटलॉगर म्हणूनही काम करीत. मध्यवर्ती ग्रंथालयातील बालविभाग हे बडोदे संस्थानचे भूषण मानले जाते. त्या विभागाची जडण व घडण सौ. प्रभुदेसाई यांनी केली. त्यांना मुलांविषयी फार लळा होता. ‘हसत खेळत शिक्षण’ हा बालशिक्षणाबाबतचा त्यांचा दृष्टिकोण होता. आणि या कार्यात त्या संपूर्ण यशस्वी झाल्या.

**पुणतांबेकर, अंबादास गोपाळ** (जन्म १५–७–१८७० मृत्यू ६–११–१९४७). शिक्षण–मॅट्रिक. व्यवसाय–नोकरी, मुंबई नगरपालिका कार्य–मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाचे एक संस्थापक आणि प्रमुख संवर्धक. १८९८ साली संस्था स्थापन केल्यापासून १९३२ साली आपणहून निवृत्त होईपर्यंत सतत ३४ वर्षे ते ग्रंथालयाचे कार्यवाह होते. मुंबई नगरपालिकेत ते नोकरी करीत असत. परंतु नोकरीव्यतिरिक्त इतर सर्वकाळ त्यांनी संस्थेची वाढ करण्यासाठी व्यतीत केला.

डॉ. सर भालचंद्र भाटवडेकर व डॉ. बाबासाहेब जयकर अशा थोर व्यक्तींना विश्वास त्यांनी आपल्या गुणांनी संपादन केला होता. आदर्श समाजसेवक असे त्यांचे वर्णन करता येईल. मुं. म. ग्रं. संग्रहालयाखेरीज दक्षिणा प्राइझ सभा या संस्थेचेही ते संस्थापक होते.

**पुराणिक, न्यायमूर्ती वा. रा.** स्वागताध्यक्ष, मध्यप्रदेश ग्रंथालय परिषद, नागपूर, १९४५. अध्यक्ष, मध्यप्रांत व वऱ्हाड ग्रंथालय संघ, १९४५–५८.

**फेरवाणी, एस. एन्.** ग्रंथपाल, मुंबई विद्यापीठ ग्रंथालय, १९१८–२०.

**बॉर्डन, डॉ. विल्यम ॲलनसन** डायरेक्टर ऑफ् स्टेट लायब्ररीज, बडोदा १९१०–१३. ग्रंथपाल, यंग मेन्स इन्स्टिट्यूट, न्यू हॅवन, यू. एस्. ए. अमेरिकेतील

ग्रंथालयतज्ज्ञ. अमेरिकेतील ग्रंथालयचळवळीत प्रामुख्याने भाग. डॉ. मेलविल ड्युई यांनी काढलेल्या ग्रंथपालन वर्गातील अध्यापक. बडोद्याच्या महाराजांनी त्यांना मुद्दामहून बोलावून आणले होते. तीन वर्षांच्या कारकीर्दीत त्यांनी मध्यवर्ती ग्रंथालयाची स्थापना केली. सर्व संस्थानभर सरकारी साहाय्याने चालणारी मोफत ग्रंथालये व वाचनालये स्थापन केली, फिरत्या ग्रंथालयांची उभारणी केली, अशिक्षित लोकांसाठी दृक्‌श्राव्य साधनांद्वारा लोकशिक्षण देण्याची यंत्रणा उभी केली. ग्रंथालयशास्त्राचे शिक्षण देण्यासाठी ग्रंथपालन वर्ग सुरू केला (१९१०–११)

**बोले, रा. ब. सीताराम केशव** (जन्म २९–६–१८६९ मृत्यू १४–१–१९६१). जस्टिस ऑफ् पीस. संपादक, 'नवयुग', मुंबई प्रांतिक विधिमंडळातील (कौन्सिल) सरकारने नेमलेले बिनसरकारी सभासद, सदस्य, मुंबई महापालिका, भंडारी समाजातील सुप्रसिद्ध समाजसेवक, १९३७ पासून स्वा. वीर सावरकरांच्या सामाजिक व राजकीय चळवळीत भाग.

यांनी मुंबई विधिमंडळात ग्रंथालयाची स्थापना व वाढ याकरिता "बॉम्बे प्रेसिडेन्सी पब्लिक लायब्ररीज् बिलाची" नोटीस दिली होती. (बिल नं. २४ सन १९३६; बॉम्बे गव्हर्नमेंट गॅझेट पार्ट ४, २९ ऑक्टो. १९३६; पृ. १९५–२०९ मध्ये प्रसिद्ध). कायदेमंडळात मांडण्यासाठी गव्हर्नरांची संमती परंतु त्यावर चर्चा होऊ शकली नाही. या बिलानुसार ग्रंथालय-कर बसविण्याचा अधिकार स्थानिक स्वराज्य संस्थांना मिळायचा होता. विधिमंडळात ग्रंथालयांच्या प्रश्नांना वाचा फोडण्याचा व ग्रंथालय कायद्याची मागणी करण्याचा हा पहिला प्रयत्न मानावा लागेल.

**भोंसुले, विष्णू आत्माराम** ( मृत्यू ६–३–१९५६ ). बी. ए. मुंबई विद्यापीठ ग्रंथालयाचे उपग्रंथपालाच्या जागेवरून निवृत्त. मुंबई विद्यापीठ व मुंबई ग्रंथालय संघाच्या ग्रंथपालन वर्गात अध्यापनाचे कार्य. ग्रंथालय विषयक उपक्रमांत व कार्यांत सक्रिय सहकार्य. सेवानिवृत्तीनंतरही विद्यापीठ ग्रंथालयांत जात असत. बहुश्रुतता, बहुभाषिकता, कामाचा उरक, हसतमुख वृत्ती आणि ज्ञानग्रहणाची असीम आवड या आदर्श ग्रंथपालाच्या ठिकाणी अपेक्षित असलेल्या गुणांचा प्रकर्ष कै. भोंसुल्यांच्या ठिकाणी झाला होता.

**राऊत, का. रा.**

मुंबई हायकोर्टाचे मुख्य ग्रंथपाल, १९१८ साली ते ग्रंथालयात नोकरीस लागले. १९३५ साली दुय्यम ग्रंथपाल व १९५४ साली मुख्य ग्रंथपाल, म्हणून काम. जुलै १९५५ मध्ये सतत ३८ वर्षे सेवा करून निवृत्त.

श्री. राऊत हे ठाण्याचे रहिवाशी. तेथील सार्वजनिक चळवळीत आस्थेने भाग घेत असत. आर्य क्रीडामंडळ, मराठी ग्रंथसंग्रहालय वगैरे संस्थांशी निकटचा संबंध. ठाणे

नगरपालिकेचे ते ८ वर्षे सभासद होते. १९४६ साली ते नगरोपाध्यक्ष झाले होते.

**सवनीस, रघुनाथ व्ही. ऊर्फ बाजी** शिक्षण–मॅट्रिक. प्रथम मुंबई विद्यापीठ कचेरीत काम. काही काल ग्रंथालय साहाय्यक, काही वर्षे ॲक्टिंग लायब्रेरियन म्हणून व नंतर ग्रंथपाल, मुंबई विद्यापीठ ग्रंथालय म्हणून काम. १९२०–३५.

* * *

## परिशिष्ट १ :

### ग्रंथपाल, ग्रंथालयसेवक व ग्रंथालयीन कार्यकर्ते यांची संख्या

( सूचीमध्ये समाविष्ट केलेल्या )

| विभाग | ग्रंथपाल व ग्रंथालयसेवक | | | | | ग्रंथालयीन कार्यकर्ते | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | विद्यापीठ | महाविद्यालयीन | शालेय | विशेष | सार्वजनिक | | |
| **प. महाराष्ट्र** | | | | | | | |
| पुणे | २२ | ५८ | १९ | ७६ | १८ | १७ | २१[illegible] |
| मुंबई | ४० | ७६ | — | ७१ | १० | ७ | २०[illegible] |
| इतर ठिकाणे | २ | ७२ | ३ | १४ | ४९ | ४३ | १८[illegible] |
| एकूण | ६४ | २०६ | २२ | १६१ | ७७ | ६७ | ५९[illegible] |
| **मराठवाडा** | | | | | | | |
| औरंगाबाद | १५ | १२ | — | ३ | ३ | ७ | ४० |
| इतर ठिकाणे | — | १३ | — | — | २ | २ | १७ |
| एकूण | १५ | २५ | — | ३ | ५ | ९ | ५७ |
| **विदर्भ** | | | | | | | |
| नागपूर | २० | २९ | — | १५ | १३ | १६ | ९३ |
| इतर ठिकाणे | — | २२ | — | १ | २४ | १२ | ५९ |
| एकूण | २० | ५१ | — | १६ | ३७ | २८ | १५२ |
| | ९९ | २८२ | २२ | १८० | ११९ | १०४ | ८०६ |
| महाराष्ट्र राज्याबाहेरील | ५ | १६ | ५ | २२ | ८ | २ | ५८ |
| अध्यक्ष | १ | — | – | — | २ | १४ | १७ |
| दिवंगत व्यक्ती | ५ | २ | – | १ | ११ | १६ | ३५ |
| एकूण | ११० | ३०० | २७ | २०३ | १४० | १३६ | ९१६ |

## परिशिष्ट २ :

### ६० वर्षे वा त्याहून अधिक वयाच्या व्यक्ती

| | |
|---|---|
| १-१२-१८८५ | आचार्य दत्तात्रय बाळकृष्ण कालेलकर, नवी दिल्ली. |
| १८८९ | दत्तात्रय वासुदेव आंबेकर, पुणे. |
| ५- ८-१८९० | म. म. दत्तो वामन पोतदार, पुणे. |
| १०- ३-१८९१ | गणेश अप्पाजी वावळे, पारनेर. |
| १७- ४-१८९१ | यशवंत रामकृष्ण दाते, पुणे. |
| १२- ८-१८९१ | यशवंत गोपाळ नाईक, यावल. |
| १५- ४-१८९३ | प्रा. नरहर रघुनाथ फाटक, मुंबई. |
| १९-१२-१८९३ | रघुनाथ बळवंत पळसाशी, बुधगाव. |
| २२- १-१८९५ | विठ्ठल दत्तात्रय घाटे, पुणे. |
| २८-१२-१८९५ | गणेश नरहर श्रीगोंदेकर, पुणे. |
| १२-१२-१८९६ | मोरेश्वर वासुदेव गोरे, अहमदनगर. |
| ५- ९-१८९७ | प्रा. अनंत काकबा प्रियोळकर, मुंबई |
| २०-१०-१८९७ | बाळकृष्ण गोविंद परांजपे, सांगली. |
| २२- ५-१८९८ | गोपाळराव पाठक, नागपूर. |
| ३०-१०-१८९८ | दिनकर विनायक काळे, पुणे. |
| १५-११-१८९८ | पुरुषोत्तम पांडुरंग गोखले, कऱ्हाड. |
| १२- १-१८९९ | डॉ. श्रीधर विठ्ठल ओक, मुंबई. |
| १०- ४-१८९९ | असफअलि असगर फैझी, मुंबई. |
| ११- ८-१८९९ | गणेश भास्कर पंडित, अलिबाग. |
| २८-१२-१८९९ | गजानन त्र्यंबक माडखोलकर, नागपूर. |
| १४- ८-१९०० | सदाशिव कान्होबा पाटील, मुंबई. |
| १९-१२-१९०० | मोरेश्वर बळवंत कुलकर्णी, जुन्नर. |
| ४- १-१९०१ | रामचंद्र हरी नानल, पुणे. |
| १६- ३-१९०१ | डॉ. प्रल्हाद बाळाचार्य गजेंद्रगडकर, मुंबई. |
| १७- ३-१९०१ | रघुनाथ शतानंद पारखी, पुणे. |
| १०- ४-१९०१ | डॉ. धनंजय रामचंद्र गाडगीळ, पुणे. |
| २५- ७-१९०१ | यशवंत काशीनाथ मंजुरे, जुन्नर. |
| १- ३-१९०२ | परशुराम गणेश मेहेंदळे, दापोली. |
| २७- ३-१९०२ | विनायक रघुनाथ जोशी, पाटण. |
| २१- ६-१९०२ | बळवंतराव गिरीराव घाटे, औरंगाबाद. |
| ८- ७-१९०२ | भालचंद्र कृष्ण देठे, मुंबई. |

| | |
|---|---|
| ३–११–१९०२ | भास्कर विष्णु पारखे, नंदुरबार. |
| १६–१२–१९०२ | त्र्यंबक दिनकर चाकनीस, मुंबई. |
| १९०२ | हरी भालचंद्र देशपांडे, तळेगांव दाभाडे. |
| २०– १–१९०३ | दत्तात्रय रामचंद्र भट, धुळे. |
| २६– १–१९०३ | भगवन्त बळवंत गर्गे, अहमदनगर. |
| २०– ६–१९०४ | बळवंत महादेव देव, पुणे. |
| १९०४ | रघुनाथ मुरलीधर जोशी, हैद्राबाद. |
| ३१–१०–१९०५ | लक्ष्मण महादेव चिटणीस, सावंतवाडी. |
| ५–१२–१९०५ | विष्णु गोपाळ फाटक, मुंबई. |
| २२– ३–१९०६ | जोनाथन् जेम्स स्टीव्हनसन, नागपूर. |
| २५– ४–१९०६ | दारा नसरवानजी मार्शल, मुंबई. |
| २१– ५–१९०६ | आप्पा नरसिंह जोशी, सोलापूर. |
| ३– ६–१९०६ | कृष्णाजी गणेश भागवत, पुणे. |
| १४– ६–१९०६ | केशव गणेश शारंगपाणी, पुणे. |
| २६– ६–१९०६ | डॉ. पुरुषोत्तम महादेव जोशी, पुणे. |
| ११–१०–१९०६ | पांडुरंग श्रीधर फडके, नागपूर. |
| १०– ३–१९०७ | लक्ष्मण गणपतराव वाराणशीवार, नागपूर. |
| २७– ३–१९०७ | पुरुषोत्तम वासुदेव पेनापुरे, मुंबई. |
| ३१– ३–१९०७ | राजाराम सखाराम शिरवळकर, मुंबई. |
| ६– ८–१९०७ | हनुमान अनंत धर्माधिकारी, पुणे. |
| १४– २–१९०८ | श्रीनिवास गणेश अमृते, अकोला. |
| ८– ३–१९०८ | विष्णु गोविंद दिवाकर, पुणे. |
| १०– ४–१९०८ | वासुदेव केशव देशपांडे, पुणे. |
| २२– ६–१९०८ | डॉ. विष्णू भिकाजी कोल्ते, नागपूर. |
| ७– ८–१९०८ | कृष्णाजी केशव राहाळकर, अलिबाग. |

* * *

## परिशिष्ट ३ :

### ग्रंथपाल व ग्रंथालयसेवक यांचे शिक्षण–आकडेवारी

| विभाग | व्यावहारिक | | | | ग्रंथपालनाचे | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | मॅट्रिक या तत्सम | पदवीधर | दोन या अधिक पदव्या | बी. एड्. टी. | अन ट्रेन्ड | प्र. प्र | डिप्. लिब्. बी. लिब्. | एम. लिब्. एस्सी. |
| प. महाराष्ट्र | | | | | | | | |
| पुणे | ८२ | ७७ | ३१ | ३ | ३४ | ६३ | ९५ | १ |
| मुंबई | ४३ | ८१ | ७१ | २ | २२ | २२ | १५१ | २ |
| इतर ठिकाणे | १०२ | २० | १८ | — | ६८ | ४० | ३१ | १ |
| एकूण | २२७ | १७८ | १२० | ५ | १२४ | १२५ | २७७ | ४ |
| मराठवाडा | | | | | | | | |
| औरंगाबाद | १२ | १३ | ८ | — | ६ | १० | १७ | — |
| इतर ठिकाणे | ९ | ५ | १ | — | ३ | ११ | १ | — |
| एकूण | २१ | १८ | ९ | — | ९ | २१ | १८ | — |
| विदर्भ | | | | | | | | |
| नागपूर | ३१ | २४ | २२ | — | १२ | २० | ४४ | १ |
| इतर ठिकाणे | २८ | ११ | ८ | — | १८ | १६ | १३ | — |
| एकूण | ५९ | ३५ | ३० | — | ३० | ३६ | ५७ | १ |
| महाराष्ट्र राज्या-बाहेरील | ७ | २६ | २३ | — | ३ | ७ | ४३ | २+१ |
| एकूण | ३१४ | २५७ | १८२ | ५ | १६६ | १८९ | ३९५ | ८ |

### इतर माहिती

| | कला | विज्ञान | वाणिज्य | विधि | शेती | शिक्षणशास्त्र | वैद्यक |
|---|---|---|---|---|---|---|---|
| (अ) पदवीधर | ३५८ | ६८ | १६ | १ | १ | — | — |
| वर्गवारी | १० | २ | ९ | १४ | — | २० | १ |

| | पुणे | मुंबई | प. महाराष्ट्र | मराठवाडा | विदर्भ | बाहेरील |
|---|---|---|---|---|---|---|
| (आ) पुरुष | १५० | ११८ | १२८ | ४१ | १०८ | ४५ |
| महिला | ४३ | ७९ | १२ | ७ | १६ | ११ |

(इ) पीएच्. डी.

(१) डॉ. पु. म. जोशी, पुणे (२) डॉ. म. अ. दळवी, पुणे
(३) डॉ. नि. इ. पंड्या, मुंबई (४) डॉ. म. प. पेठे, पुणे
(५) डॉ. मा. बा. वजिफदार, मुंबई

## परिशिष्ट ४ :

### ग्रंथपालनाचे विविध अभ्यासक्रम व त्यांची प्रमाणपत्रे धारण करणाऱ्या व्यक्ती

१ ) लाहोर येथील संतराम यांचा पत्रव्यवहार अभ्यासक्रम

हा अभ्यासक्रम २० व्याख्यानांचा ( लेसन्स ) होता. स. प. महाविद्यालयाचे ग्रंथपाल श्री. काका कोल्हटकर यांनी १९२४ मध्ये हा अभ्यासक्रम पुरा केला.

२ ) इंपीरियल लायब्ररी, कलकत्ता, सर्टिफिकेट अभ्यासक्रम

हिं. का. व्यास, मुंबई ( १९३७ )
कृ. ग. भागवत, पुणे ( १९३९ )
ल. ग. वाराणशीकर, नागपूर ( १९४० )
ल. के. गोरे, मुंबई ( १९४१ )
जोनाथन् स्टीव्हनसन्, नागपूर ( १९४४ )
कै. नटवरलाल अंबालाल दलाल

३ ) बडोदा सेंट्रल लायब्ररीचा सर्टिफिकेट अभ्यासक्रम

वि. गो. दिवाकर, पुणे ( १९४० )
द. वा. जोशी, पुणे ( १९४१ )

४ ) मद्रास विद्यापीठ, सर्टिफिकेट अभ्यासक्रम

र. श. पारखी, पुणे ( १९३२ )
पां. श्री. फडके, नागपूर ( १९३३ )
या. मु. मुळे, कलकत्ता ( १९३४ )
कृ. ग. भागवत, पुणे ( १९३६ )

५ ) मद्रास विद्यापीठ, डिप्लोमा अभ्यासक्रम

पु. कृ. गर्दे, न्यूयॉर्क ( १९४१ )
व. पां. भागवत, पुणे ( १९४१ )
वा. पु. कोल्हटकर, पुणे ( १९४२ )
अ. वि. धाटवे, मुंबई ( १९४२ )
कृ. शं. हिंगवे, पुणे ( १९४२ )
कु. इन्दु नवाथे, पुणे ( १९४३ )

६ ) मुंबई विद्यापीठ, डिप्लोमा अभ्यासक्रम

पहिली तुकडी ( १९४३–४४ ) : ना. म. केतकर ( दिल्ली ), भा. कृ. देठे ( मुंबई ), वि. गो. फाटक ( मुंबई ), ज. वा. बुधकर ( पुणे ), डी. एन्. मार्शल ( मुंबई ), र. पां. रेगे ( मुंबई ). शां. शं. रेगे ( मुंबई ).

याशिवाय पुढील विद्यार्थी १९४४ च्या परीक्षेत उत्तीर्ण झाले.

शांतिलाल छगनलाल उपाध्याय, गणेश विश्णू करमरकर, जयंतीलाल शंकरलाल जरीवाला, जगदीश चुनिलाल दलाल, मंगेश शिवराम नाडकर्णी, महेंद्र नथनमुखलाल पंड्या, प्राणलाल मायाराम पाठक, लीला चिंतामणी भागवत, माधव यज्ञेश्वर भांडारकर, के. पी. अनंथन् मेनन, वामन सीताराम सप्रे, सरोजिनी मंगळदास सेठना.

### ७ ) पुणे ग्रंथालय संघ, प्रमाणपत्र अभ्यासक्रम

पहिली तुकडी ( १९४७ ) : वि. ह. अभ्यंकर, प्र. दि. कुलकर्णी, वि. गो. दिवाकर, ब. म. देव, मु. वा. देशपांडे, वा. के. देशपांडे, व. भि. वेलसरे, के. ह. बोरगांवकर ( सर्व पुणे येथील ).

( हा वर्ग १९५१ पासून महाराष्ट्र ग्रंथालय संघातर्फे चालविला जातो. )

### ८ ) बनारस विद्यापीठ, डिप्लोमा अभ्यासक्रम

ग. नि. भवाळकर, नागपूर ( १९४७ ).

### ९ ) दिल्ली विद्यापीठ, मास्टर ऑफ लायब्ररी सायन्स

कु. द. पुराणिक, मुंबई ( १९५० ) कु. मु. उजळंबकर, पुणे ( १९५१ )
वा. शि. मोघे, इंदूर ( १९५३ ) व. वि. कुलकर्णी, नागपूर ( १९५४ )
श्री. प्र. फडणीस, दिल्ली ( )
मो. र. खान आफिडी, मुंबई ( १९६५ ) बी. सी. जकाती, कोल्हापूर ( १९६५ )

### १० ) मुंबई ग्रंथालय संघाचा ग्रंथपालन वर्ग

पहिली तुकडी ( जुलै १९५१–मार्च १९५२ )

गं. र. पारखी ( दिल्ली ), रा. श्री. शिरवळकर ( मुंबई ), बा. द. सातोस्कर ( पणजी ) ( सर्वप्रथम ).

*याशिवाय पुढील विद्यार्थी उत्तीर्ण झाले* :

ग. वि. कंटक, चिं. श्री. गोखले, द. ग. घुगरे, के. ब. जोशी, प्र. श्री. जोशी, सौ. इंदिराबाई तेलंग ( तृतीय क्रमांक ), सु. रा. नायक ( द्वितीय क्रमांक ), भ. तु. पागे, अ. बा. बादेकर, वि. ना. बिर्जे, रा. द. बेंबळकर, सौ. शांता भाटवडेकर, कु. दीपा मांजरेकर, सौ. लीला यार्दी, कु. कस्तुर वेलकर, सुं. भा. वैद्य, भानू शिरधनकर, वि. वा. शेजवलकर, ना. मा. सर्वदे व गु. कृ. सांगेकर.

यानंतर खालीलप्रमाणे विद्यापीठांनी व ग्रंथालय संघांनी ग्रंथपालन वर्ग सुरू केले.

( १ ) नागपूर विद्यापीठ ( १९५६ ) ( २ ) पुणे विद्यापीठ ( १९५८ )
( ३ ) विदर्भ ग्रंथालय संघ ( १९५८ ) ( ४ ) मराठवाडा ग्रंथालय संघ ( १९६० )
( ५ ) श्री. ना. दा. ठा. म. विद्यापीठ ( १९६१ ) ( ६ ) शिवाजी विद्यापीठ ( १९६५ )
( ७ ) मुंबई ग्रंथालय संघ ( मराठी माध्यम : १९६५ ).

## परदेशातील अभ्यासक्रम

कै. श्री. वाय. के. कुंटे : युरोप, १९१३.
श्री. र. श. पारखी ( पुणे ) : कोलंबिया विद्यापीठ, पत्रव्यवहार अभ्यासक्रम. १९३०–३१.
श्री. त्र्यं. दि. वाकनीस ( मुंबई ) : लंडन स्कूल ऑफ लायब्ररी सायन्स ( १९३६ ) एफ्. एल्. ए. ( १९३६ ).
डॉ. पु. म. जोशी ( पुणे ) ग्लासगो व बर्मिंगहॅम येथील समर स्कूलसना उपस्थित ( १९३४ ). लायब्ररी असोसिएशन, लंडनचा अभ्यासक्रम पूर्ण ( १९३५ ).
श्री. या. मु. मुळे ( कलकत्ता ) : लंडन विद्यापीठ, १९३८. एफ्. एल्. ए. १९३८
डॉ. सुभद्रा चितळे ( दिल्ली ) : डब्लिन, आयर्लंड : १९४७ डिप्. लिब्.
श्री. द्विजेंद्रनाथ दत्ता ( नागपूर ) : ए. एल्. ए. ( लंडन ) चार्टर्ड लायब्रेरियन.
श्री. पद्मकांत शाह ( मोड्रीन-कल्याण ) : ए. एल्. ए. ( लंडन ) १९५७. चार्टर्ड लायब्रेरियन.
श्री. मोहन गद्रे ( वॉशिंग्टन ) : सिरॅक्युज युनि ( यू. एस. ए. ) १९६१.

## परिशिष्ट ५ :

### ग्रंथपालन वर्गाचे अध्यापक

#### पुणे

कु. मु. उजळंबकर, ह. वा. उमराणीकर, दि. वि. काळे, प्र. दि. कुलकर्णी, वा. यु. कोल्हटकर, मा. ल. गाडगीळ, कै. डॉ. वा. दा. गोखले, डॉ. पु. म. जोशी, व. प्र. जोशी, वि. अ. जोशी, मु. वा. देशपांडे, भा. नी. पटवर्धन, र. श. पारखी, डॉ. म. प. पेठे, शं. ना. बर्वे, ज. बा. बुधकर, य. भि. वेलसरे, के. ह. बोरगावकर, पु. ग. ब्रह्मे, कु. ग. भागवत, शां. ग. महाजन, अ. रा. मेहेंदळे, त्रिं. ह. लागू, द. वा. शेवडे, प्र. शि. स्वामी, कु. शं. हिंगवे.

#### मुंबई

बर्नार्ड ॲंडरसन, पु. वा. ऐनापुरे, कै. स. ल. कापडी, डॉ. एल. वी. केणी, कु. खांडवाला, कें. पी. गणपथी, एस्. आर. गणपुले, मु. आ. गावस्कर, कु. नीला चेट्टी, सी. ई. जॉन, कै. दलाल, दि. कृ. देवनाळी, एम्. के. आर. नायडु, डॉ. नि. इं. पंड्या, ह. परांजपे, कु. पॉन्टेम्, कृ. द. पुराणिक, जी. सी. बॅनर्जी, एस्. डी. बर्वे, कै. वि. आ. मोसुले कु. मडिमन, डॉ. कृ. र. महिषी, डी. एन्. मार्शल, प्रा. कुमुद मेहता,

कांता मेणकूरकर, रा. के. लेले शां. शं. रेगे, डॉ. वजिफदार,
त्र्यं. दि. वाकनीस, शेषाचारी, पु. रा. साठे, प्रा. एस्. एस्. होस्कोट.

नाशिक

रा. पु. गानू, कृ. सी. चोळकर, र. त्र्यं. देशमुख, नाखरे,

कोल्हापूर

ब. च. जकाती, अ. चिं. टिकेकर, कै. परब, एम. डी. राऊत.

औरंगाबाद

कु. आवेकर, गो. श्री. कट्टी, वि. ना. कुंटूरकर,
प्रा. ना. श्र. गोरे, र. गो. जोगदेव, क. शो. देशपांडे
रा. त्र्यं. वडवे, के. द. वडजीकर, सा. पा. शेरकर,
रा. य. सराफ, डी. जे. सुभेदार.

नागपूर

एस. बी. अगरवाल, मो. यु. कुरेशी, व. वि. कुलकर्णी,
दि. ना. धारे, दि. ग. जोशी, हे. ह. टिळक, दत्ता,.
सु. वा. देशपांडे, पं. पां देशमुख, उषा नेमावरकर,
र. भ. पवार, पां. श्री. फडके, ग. नी. भवाळकर,
भा. गो. वणीकर, विजयकुमार पाथुरी, द. मु. होटे,

महाराष्ट्र राज्याबाहेरील

ना. म. केतकर, मु. य. गुप्ते, घन, म. गो. देशमुख,.
सू. मा. कुलकर्णी, वा. शि. मोघे सु. ना. वर्टीकर

## परिशिष्ट ६ :

### ग्रंथालयविषयक लिखाण करणाऱ्या व्यक्ती

पुणे

उजळंबकर, उमराणीकर, दि. वि. काळे, वा. पु. कोल्हटकर,.
द. गो. गोरे, डॉ. पु. म. जोशी, व. च. जोशी, वि. अ. जोशी,
डॉ. दळवी, वा. द. दिवेकर, र. श. पारखी, पारगावकर,
डॉ. पेठे, शं. ना. बर्वे, बुधकर, य. भि. वेलसरे,
बोरगावकर, कृ. ग. भागवत, शां.ग.महाजन, कु. शकुंतला रानडे, लागू,.
वाळंबे, श्रीगोंदेकर, स्वामी, कृ. शं. हिंगवे.

श्री. या. मु. मुळे (कलकत्ता): इंग्लंड व युरोप (१९३६–३७), मॅनिला (१९६४); रोम, पॅरीस, लंडन, अमेरिका,जपान,हॉंगकॉंग,बॅंकॉक(१९६६).
कु. इन्दु नवाथे (पुणे): अमेरिका (१९५२).
श्री. डी. एन्. मार्शल (मुंबई): व्हिएन्ना (१९५३) व युरोपीय राष्ट्रे, इंग्लंड.
सौ. प्रमिला दातार (कलकत्ता): ऑस्ट्रेलिया (१९५२).
श्री. ना. म. केतकर (दिल्ली): अमेरिका व इंग्लंड. कोलंबो (१९६१).
डॉ. वजिफदार (मुंबई): अमेरिका (इंडिया व्हीटलोन योजना: १९५५).
श्री. अँडरसन (मुंबई): अमेरिका ( ,, ,, ,, : १९५६–५७), इंग्लंड, फ्रान्स, रोम.
श्री. कानिटकर (दिल्ली): अमेरिका ( ,, ,, ,, : १९५६–५७).
श्री. हिंगवे (पुणे): अमेरिका ( ,, ,, ,, : १९५६–५७), कोलंबो (१९६१).
कु. खांडवाला (मुंबई): अमेरिका ( ,, ,, ,, : १९५५), इंग्लंड (ब्रिटिश कौन्सिल).
श्री. देवनाळी (मुंबई): इंग्लंडमधील ग्रंथालयांचे निरीक्षण.
डॉ. दळवी (पुणे): ,, ,, येताना काही युरोपीय व मध्यपूर्व देशांना भेटी.
श्री. भत्राळकर (नागपूर): वॉशिंग्टन (१९६३), इंग्लड, पॅरीस, रोम.
श्री. गं. र. पारसी (दिल्ली): रशिया (१९६४).
श्री. मा. कृ. केळकर (कानपूर): अमेरिका (१९६५).
सौ. आशा ओगले (कराड): इंग्लंडमध्ये इंटर्नशिप (१९६४).
श्री. कार्लेकर (गोमंतक): ,, ,, (१९६३–६४).
श्री. सु. वि. जोगळेकर (पुणे): ,, ,, (१९६७– ).
श्री. प. ल. जोगळेकर: ,, नोकरी (१९६६– ).

## परिशिष्ट ८ :

### संदर्भ साहित्य

१) पुणे नगर वाचन मंदिराचा शंभर वर्षांचा इतिहास, १८४८–१९४८ संपा. ग. न. श्रीगोंदेकर. पुणे. १९४९. ५ रु.
२) विदर्भातील ग्रंथपालांची सूचि–वसंत ब. जोशी (ग्रंथपाल, वर्ष ३, अंक १ व २ ऑक्टो. १९६० मार्च १९६१. मराठी ग्रंथालय परिषद विशेषांक).
३) पुण्यातील ग्रंथपाल, ग्रंथालयसेवक व ग्रंथालयीन कार्यकर्ते यांची सूचि: शां. ग. महाजन (महाराष्ट्र राज्य ग्रंथालय परिषद, सोळावे अधिवेशन, डिसें. १९६४

स्मरण–पुस्तिका ) पुणे नगर वाचन मंदिर, पुणे. १९६४.
4 ) Indian Library Directory comp. by S. R. Ranganathan and others. 3rd edition. 1951. Delhi. Indian Library Association.
5 ) Directory of Libraries and who's who in Library Profession in Delhi Ed. by N. K. Goil and others. Dehi Library Association, P. O. 1270, C/o Hardinge Public Library, Queen's Garden, Delhi 6. 1964. Rs. 12–
6 ) Men of Library Science and Libraries in India. Premier Publishers ( India ), P. B. 2578, 9/6601 Devnagar, Karol Bagh, New Delhi 5. 1967. Rs. 30/–
7 ) Directory of Libraries, Publishers and Booksellers in the city of Bombay. Ed by Vidyut Khandwala and M. K. R. Naidu. S. N. D. T. Women's University, Bombay 1. 1965. Rs. 5/–
८ ) मराठवाडा ग्रंथालय संघ, वाटचाल, १९५९–६६ के. द. वडजीकर. मराठवाडा ग्रंथालय संघ, औरंगाबाद. १९६६.
९ ) मराठी ग्रंथसूचि–शं. ग. दाते ( १० ) Who's Who of Indian Writers ( ११ ) Times of India Directory and who's who ( १२ ) साहित्य सहकार, ग्रंथपाल, Indian Librarian ही मासिके ( १३ ) लेखक परिचय सदर– शं. ना. वर्वे ( साहित्य सहकारमधील ) ( १४ ) ग्रंथालय संघ, ग्रंथालय परिषदा व ग्रंथालये याचे अहवाल.

* * *

## शुद्धिपत्र

| पृ. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ६ | ८ | गाखले | गोखले |
| ७ | ११ | लायुब्रेरियन | लायब्रेरियन |
| ८ | २८ | प्रराकान | प्रकाशन |
| १९ | २३ | डिव्. | डिप्. |
| २५ | २५ | १९६२ | १९६३ |
| २७ | २१ | डिव्. | डिप्. |
| ३९ | १० | फड्गी | फैझी |
| ४८ | १५ | फुरावकर | मुरावकर |

---